# मानस-मंदिर

( मानसशास्त्राच्या अद्यावत् सिद्धान्तांची सुबोध चर्चा करून वैय्यक्तिक व सामाजिक जीवनासंबंधीं नवी दृष्टि देणारें पुस्तक. )

लेखक : ना. सी. फडके,
एम्.ए.

प्रथमावृत्ति
ऑक्टोबर १९३५.

किंमत १। रुपया.

प्रकाशकः—डी. एन्. मोघे, बी. ए.
प्रोप्रा. स्कूल ॲण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर.





२ हें पुस्तक लिहावयास लेखकानें ता. ७ एप्रिल १९३३ रोजीं प्रारंभ केला व ता. १७ मार्च १९३४ रोजीं संपविलें.

३ ह्या पुस्तकाचा मजकूर प्रथम किर्लोस्कर मासिकांत १९३३–३४ सालीं लेखमालेच्या रूपात प्रसिद्ध झाला.



मुद्रकः—कृ. ह. सहस्रबुद्धे,
श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

प्रो.

वामन
मल्हार
जोशी

यांस

आदरपूर्वक
अर्पण

# अनुक्रमणिका

खरें कार्य प्रवृत्ती निर्माण करण्याचें नसून त्यांचें नियंत्रण करण्याचें आहे. ४. मानवी प्रगति याचा अर्थ त्याच्या देहधर्मांची प्रगति नव्हे, तर माणसाच्या मनाच्या व्यापारांत, कार्यांत व संवयींत झालेली प्रगति.

प्रकरण ५ वें : **अवधान : त्याचीं दोन स्वरूपें व त्रिविध परिपाक**

१. वस्तु व वस्तुधर्म : उलट, मन व मनोधर्म. २. मन म्हणजे 'अवधान'. ३. अवधानाचे तीन परिपाक : विचार, विकार व संकल्प. ४. निरवधान : अवधान व अस्पष्टावधान. ५. समुद्राचें पृष्ठ व पोट. ६. अवधानाचे नियम. ७. अवधानाचें मूल कारण 'संकल्प'.

प्रकरण ६ वें : **मानवी कर्तृत्वाची नवी मीमांसा**

१. सर्व यशापयशाचा व सुखदुःखांचा उगम अवधानक्रियेंत. २. अभ्यासानें गोंधळणारा विद्यार्थी, कचेरींत बोलणीं खाणारा कारकून, बायकांमुलांशीं ज्याचें पटत नाहीं असा संसारी– यांच्या उदाहरणांची छाननी. ३. माणसाला स्वतंत्र कर्तृत्व आहे काय ? ४. दैववाद खरा कीं प्रयत्नवाद ? ५. मानसशास्त्रानुसार निघणारा सिद्धान्त : अवधानसामर्थ्य म्हणजेच कर्तृत्वशक्ति. ६. व्यसनी माणसाचें व्यसन कां सुटत नाहीं ? ७. इष्ट हेतूवर अवधानकेंद्र साधण्यास शिकलें पाहिजे. ८. वृक्षबीजन्याय.

प्रकरण ७ वें : **मनुष्य संकल्पप्रधान प्राणी आहे**

१. विचार, विकार व संकल्प या तिहींत आद्यस्थानीं काय ? २. विचार ?—नव्हे, संकल्प ! मनुष्य विचारप्रधान प्राणी नसून संकल्पप्रधान प्राणी आहे. ३. मानसशास्त्र याचा सरळ, सोपा अर्थ 'अनुभवा'चें शास्त्र. ४. अनुभवाला नेहमीं तीन अंगें असतात :

संकल्प, विचार व विकार. ५. संकल्पामुळें विचार, विकार उद्भवतात व या विचार–विकारांमुळें संकल्प दृढमूल अगर निर्मूल होत जातात–असा अनुभवाचा चक्रनेमिक्रम चालतो. ६. अनुभवाच्या वाढीचे तीन नियम : धारण, संयोग व निवड. ७. म्हणजे संकल्पच साऱ्याच्या मुळाशीं. संकल्पानें साध्य ठरतें व विचारानें साधनें ठरतात. ८. संकल्प हींच साऱ्या मानवी व्यवहाराच्या बुडाशीं असलेली प्रचोदक शक्ति.

प्रकरण ८ वें : **मानसशास्त्र व बालसंवर्धन**

१. मानसशास्त्रांतील चार मुख्य तत्त्वें. २. या तत्त्वानुसार आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाची पुनर्घटना करण्याची आवश्यकता. ३. बालसंगोपनाचा व बाल-शिक्षणाचा प्रश्न. ४. विपर्यस्त मानसशास्त्रावर आधारलेलें विपर्यस्त बालशिक्षण. ५. लहान मुलांच्या उच्छृंखलपणाचा खरा अर्थ. ६. मुलांच्या असत् प्रवृत्ती पाहतांच व्यर्थ घाबरूं नये. ७. त्या घालवतांना लक्षात ठेवण्यासारखा नियम. ८. मुलांचा हट्ट अगर अभिमान हें एक मोठें जीवनतत्त्व आहे; तें दाखवूं नये. ९. मुलाना शिकविण्यापेक्षां शिकूं द्यावें. १०. आईबाप व शिक्षक हे आपले दोस्त आहेत अशी भावना मुलांना उत्पन्न करावी.

प्रकरण ९ वें : **मानसशास्त्र व संसार**

१. संसार ही एक आपत्ति नसून कला आहे. २. बालसंवर्धनाची पद्धति व एकंदर समाजाचें आचारशास्त्र यांत नेहमीं साम्य असतें. ३. आपल्या बालसंवर्धन पद्धतीप्रमाणें आपल्या धर्माच्या व नीति-शास्त्राच्या बुडाशींही चुकीचें मानसशास्त्र आहे. ४. आमच्या सर्व व्यवहाराची प्रेरक शक्ति ‘भीति’

होय. ५. त्यामुळें व्यक्तीचा धीटपणा व आत्मविश्वास ढासळतो आणि, संसार म्हणजे एक झुंझ वाटूं लागते !

## प्रकरण १० वें : कामप्रेरणा

१. कामप्रेरणा पशुकोटींतील नव्हे. २. 'लोभ' व 'काम' हे दोन्ही षड्रिपूच; पण एकाचा आम्ही बडेजाव वाढवितो व दुसऱ्याला भितों. असें कां ? ३. जसा 'काम' तशीच 'क्षुधा'; पण त्या प्रेरणेचा आम्हीं निर्भयपणें विचार केला आहे, आणि कामाचा मात्र नाहीं ! ४. कामप्रेरणेचें कार्य व हेतु फार व्यापक आहेत. ५. सर्व ध्येयप्रीतीच्या बुडाशीं कामप्रेरणा आहे. ६. ललितकलांचा परिपोषही या प्रेरणेनेंच होतो.

## प्रकरण ११ वें : मानसमंथन ( Psycho - Analysis )

१. मानसमंथनवादाचा उगम. २. जाणीव व नेणीव याबद्दलचा डॉ. फ्रॉइडचा सिद्धान्त. ३. कामप्रेरणेचा कोंडमारा साऱ्या व्याधींच्या मुळाशीं. ४. प्रत्येक मनुष्य मनानें मात्रागमनी आहे असें फ्रॉइडनें कां ठरविलें ? ५. फ्रॉइडची 'विकल्पव्यय' उपचारपद्धति. ६. डॉ. ॲडलरचा 'सत्ताप्रवृत्ति' सिद्धान्त. ७. डॉ. युंगचें नेणिवेबद्दलचें भिन्न मत.

## प्रकरण १२ वें : उपसंहार

मनाचें अंतिम रहस्य कधीं उलगडायचें नाहीं. २. पण त्याच्या व्यक्त व ज्ञेय व्यापारांवर प्रकाश पडत आहे. ३. स्वभाव व ध्येय यांत अंतर असावें, पण विरोध नसावा. ४. नवमानसशास्त्राचें सार असें, कीं माणसानें लपंडाव व भीति सोडली पाहिजे. ५. सुखाचें खरें स्वरूप. ६. अखेरचें सांगणें.

---

# मानस–मंदिर



## प्रकरण १ लें

पृथ्वीपर्यटण करीत मुंबईच्या बंदरांत आलेल्या एका अजस्त्र आगबोटीवरील पाच सहा उतारूंची व माझी काहीं निमित्तानें ओळख झाली. मी त्या मंडळीस मुंबईतील सर्व प्रेक्षणीय स्थळें दाखविलीं. आम्ही घारापुरीचीं लेणीं पाहून आलों, शनिवार साधून मुंबईच्या रेसेसही पाहिल्या, आणि जुहूस जाऊन मनसोक्त पोहण्याचा कार्यक्रमहि सोडला नाहीं. रात्रीं त्या मंडळींच्या आग्रहावरून मी त्यांच्या घरीं–म्हणजे त्या राजप्रासादासारख्या बोटीवर–जेवायला गेलों. जेवताना गप्पा सुरू झाल्या, तेव्हा प्रश्न निघाला, की जगातलें सर्वात भव्य, सर्वात मनोहर, आणि शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें सर्वात प्रेक्षणीय मंदिर कोणतें ?

ती सारी मंडळी चारी खंडें पाहून आली होती. हा प्रश्न निघताच त्यापैकी प्रत्येकजण आपल्या रुचीप्रमाणे बोलूं लागला. कोणी पॅरिस शहरातल्या ख्रिस्ती मंदिराला अग्रस्थान दिले, कोणी रोमच्या देवळाची तारीफ केली, कोणी टोकियोच्या जपानी मंदिराची महति गाइली, मक्केच्या मशिदीची वाखाणणी करणाराही एक इसम त्यात निघाला, आणि अमृतसरच्या सुवर्णमंदिराचाहि उल्लेख झाल्यावाचून राहिला नाहीं. मी ती सारी चर्चा नुसती कौतुकानें ऐकत होतों. मी काहीच बोलत नाहीं हें पाहून त्या मंडळींपैकीं एकानें मला म्हटलें,

" कां हो, तुम्ही कांहींच बोलत नाहीं ? "

किंचित् हास्य करून मी म्हटलें,

" मी काय बोलूं! मी कांहीं तुमच्यासारखं पर्यटण केलेलं नाहीं. इतकं मात्र म्हणतों, कीं तुमच्या तोंडून आतां देशोदेशींच्या उत्तमोत्तम मंदिरांचीं जीं वर्णनं ऐकलीं तीं ज्याच्यापुढं फिकीं पडतील असं एक मंदिर मला माहित आहे. त्याचा नामनिर्देश तुमच्यापैकीं कोणीच कसा केला नाहीं याचं मला आश्चर्य वाटतं... "

माझ्या या बोलण्याचें त्या मंडळीस बरेंच नवल वाटलेसें त्यांच्या चर्येवरून उघडच दिसलें. त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला,

" कुठलं मंदिर म्हणतां बुवा? लेनिनग्राड शहरांतलं जुनं देऊळ, कां तिबेटांतल्या लामांचा विहार, कां पॅलेस्टाइनमधली... "

" छे, छे ! " मी हंसून मान हालवीत म्हटलें, " मी म्हणतों त्या मंदिराच्या तोडीचं मंदिर कोठल्याहि देशांत सांपडायचं नाहीं. त्याच्या अफाट विस्ताराकडे पाहिलं कीं, माणूस भाबावून जाईल, तसाच त्याच्या सूक्ष्म, मनोहर, प्रमाणबद्ध अंगोपांगांकडे दृष्टि टाकली, कीं माणसाला विलक्षण आल्हाद झाल्यावांचून राहणार नाहीं. त्याला किती सभामंडप आणि किती दालनें आहेत याचा अजूनही पुरता शोध लागलेला नाहीं; आणि त्याच्या शिखरावर खरोखरच कोणी कौशल्यानें आरोहण केलें तर त्याला देवत्व यायला वेळ लागायचा नाहीं ! शिवाय, असं कीं या मंदिरांत प्रवेश करायला अमक्याला परवानगी आणि तमक्याला मनाई असा विधिनिषेध नाहीं. तेथें कोणीहि प्रवेश करावा, आणि उपासना करावी ! किंबहुना इतर कोठल्याहि देवळांत चालणाऱ्या उपासनेहून तेथली उपासना अधिक लवकर माणसाला अज्ञानापासून व अविद्येपासून मुक्त करील ! पण शरमेची गोष्ट अशी, कीं या मंदिराकडे दृष्टि टाकण्याची कोणाला बुद्धिच होत नाहीं ! "

हें माझें बोलणें ऐकून ती मंडळी अधिकच बुचकळ्यांत पडली. त्यांनीं विचारलें,

" आहे तरी कुठें तुमचं हें मंदिर ? आपण पाहूं तरी ! कुठें आहे ? फार लांब आहे ? "

" छे, छे ! " मी म्हटलें " अगदीं नजीक आहे. त्याचं नांव **मानसमंदिर** ! तें तुमच्या, माझ्या, प्रत्येकाच्याजवळ आहे. आपण त्याच्याकडे वळून बघत नाहीं म्हणून ! वळून पाहिल्यावर त्याची भव्यता अन् त्याचं सौंदर्य पटायला वेळ लागणार नाहीं ! "

खरेंच असें आहे !

दिवसाकांठीं एक क्षणभर तरी आपल्यापैकीं किती जण असें म्हणतात कीं, आतां व्यावहारिक जगांतील धांवपळ अजिबात बंद करून मी जरा आपल्या अंतःकरणांत डोकावून पहाणार, जरा एकांतांत बसणार, माझ्या मनांत विकारांच्या व सुखदुःखांच्या ज्या घडामोडी होत आहेत त्या लक्षपूर्वक पाहणार ? फारच थोडे. किंबहुना, आपण बहुतेक सर्वजण अशा रीतीनें रात्रंदिवस वागत असतों, कीं जणूं आपल्याजवळ " मन " नांवाची कांहीं अंतस्थ वस्तू आहे याची आपल्याला दादही नसते ! आपण नोकरी करतों, शिक्षण घेतों, लिहितों अगर वाचतों, राज्यें जिंकतो, घालवितों,गेलेलीं परत मिळविण्यासाठीं धडपडतों, खेळ खेळतों अगर अचाट साहसाचीं कामें करतों, करमणूक करतों अगर करून घेतों, न्याय देतों अगर मानतों, धर्म स्थापतों, अगर मोडतों; आणि या साऱ्या धुमश्चक्रींत आपल्या अंतस्थ मनाची आपल्याला शुद्धबुद्ध रहात नाहीं ! कोणी आपल्याला विचारलें, काय रे, तुझें मन तूं कधी निरखून पाहिलें आहेस कां ? तर आपण झोंपेंतून दचकून उठलेल्या माणसासारखा भांबावलेला चेहरा करून म्हणूं ,

" माझं मन ?... अं ...अं...कोणास ठाऊक !..."

आपल्या हातून घडणारा हा प्रमाद हास्यास्पद तर खराच; पण तो घडावा हें साहजिक आहे. माणसाच्या अगदीं जवळ जी वस्तू असते ती त्याला दिसत नाहीं. दूरचे डोंगर चटकन् दिसतात, येवढेंच नव्हे तर ते शोभिवंतही दिसतात हें जसें खरें, तसेंच जवळचे डोंगर दृष्टींत भरत नाहींत हेंही खरें आहे. मासळीला स्वतःचें चमकदार, चंदेरी पोट कधीं दिसत नाहीं. नागाला आपल्या फणींतला तेजोमणी कधीं पहावयास सांपडत नाहीं. कस्तुरीमृगाला आपल्या पोटांतली कस्तुरी अजून कोठें

हुंगायला मिळाली आहे ? इतकें कशाला, काचेला पारा लावण्याची कला जोंपर्यंत निघाली नव्हती तोंपर्यंत माणसाला स्वतःचे डोळे कोठें पाहतां आले होते ?

साधनाकडे आपलें लक्ष रहात नाहीं. त्या साधनाच्या योगानें साधावयाच्या कार्यांतच आपलें सारें लक्ष गुंतलेलें असतें. गडद अंधाऱ्या रात्रीं अनोळखी वाटेनें जावयाचें झालें, व आपण मशाल पेटवून—किंवा आज साजेलसें बोलायाचें असल्यास विजेची मशाल असें म्हणूं—बरोबर घेतली, तर आपलें सारें अवधान आपण किती रस्ता चालून आलों इकडे असणार, त्या मशालीचें भानहि आपल्याला उरायचें नाहीं, हें ठरलेलें आहे. मी हा सारा मजकूर ज्या टाकानें लिहीत आहे त्याकडे मुद्दाम कांहीं कारणानें माझें लक्ष खेचलें गेलें तरच जाईल; एरव्हीं नाहीं. शिडी चढून जाणारा वर पहात असतो, शिडीकडे नव्हे. एका गोष्टींतल्या साक्षीदारबाईनें न्यायाधिशाला विचारलें, ' न्यायमंदिराला पायऱ्या किती आहेत ?' तेव्हां त्याला कोठें उत्तर देतां आलें ? राजा सिंहासनावर बसतो, आणि हरप्रकारचे हुकूम सोडतो; कोणाचें कल्याण करतो, कोणाला शासन करतो, युद्ध पुकारतो अगर थांबवितो, तहनामे मोडतो अगर करतो, परराष्ट्राशी स्नेह जोडतो अगर वैर आरंभतो. पण राजसत्तेच्या ज्या अधिष्ठानावर बसून तो हे सारे व्यवहार करतो त्या सिंहासनाचें वजन किती आहे, अगर त्याला पाय किती आहेत, अगर त्याला रत्नें किती जडविलीं आहेत त्याची त्यानें कधीं अगत्यपूर्वक आठवण ठेवली आहे काय ?

आपलें मन हेंही अधिष्ठानासारखेंच, अगर आपल्या हातांत आपण घेतलेल्या विजेच्या मशालीसारखेंच आहे. त्या अधिष्ठानावरूनच आपण आपले नित्यनैमित्तिक सर्व व्यवहार करीत असतों. किंवा असें म्हणूं, कीं मनोदीपाचे किरण वस्तूवस्तूवर पाडूनच आपण हरतऱ्हेचें ज्ञान संपादित असतों. जगाच्या या अफाट, अंधाऱ्या रानांतून आपल्यापैकीं प्रत्येकजण कमी अधिक ठेंचकळत ज्ञानमार्गाचा शोध काढीत थोडा फार प्रवास करतो तो मनस्वरूपी विजेचा दिवा हातीं आहे म्हणूनच. तो दिवा

आपल्या हातीं सारखा आहे. त्याला विसंबून आपलें घडीभरही चालायचें नाहीं; आणि गंमत अशी कीं असें आहे म्हणूनच आपल्या या मनाबद्दल नीट विचार करायची आपल्याला कधीं फुरसत अगर इच्छा होत नाहीं!

असें असल्यामुळें एकंदर मानवी संस्कृतीच्या इतिहासांत मानसशास्त्राचा उदय व्हावयास फार अवधि लागतो. माणसाच्या मतीचें असें आहे, कीं ती कशानें तरी कुंठित झाल्याखेरीज तिची क्रिया सुरू होत नाहीं. क्रियाप्रतिक्रियेचा न्याय अखिल विश्वांत भरलेला आहे म्हणून म्हणा, अगर कांहीं म्हणा, माणसाची मति विस्मयाच्या धक्यानें मागें लोटली गेल्याखेरीज तिची निकराची चाल सुरू होत नाहीं एवढें खरें. याच अर्थानें म्हणतात, कीं विस्मय ही सर्व शास्त्रकलांची आणि तत्वज्ञानाची जननी आहे. माणसाला कशाचें तरी विलक्षण आश्चर्य वाटावें लागतें, आणि मगच त्याविषयीं आपली मति चालवून तो त्या विषयाचें शास्त्र बनवितो. मनुष्याची दृष्टी प्रारंभीं बहिर्मुख असल्यामुळें त्याच्या दृष्टीला अगदीं प्रथम थक्क करून सोडणारा चमत्कार म्हणजे त्याच्या डोक्यावर सभोंवार पसरलेलें नभोवितान, आणि सूर्यचंद्रगोल, व अगणित तारामंडळ होय. म्हणून कोणत्याहि देशांत उदय पावणाऱ्या शास्त्रांचा क्रम पाहिला तर अगदीं प्रथम खगोलशास्त्राचा उदय झालेला दिसतो.

या शास्त्राचा उदय झाला,कीं वन्य पशूला रक्ताची चटक लागावी तद्वत् मानवी मतीला शास्त्रसिद्धीची चटक लागते. भोंवतालच्या सृष्टीचा एखादा चमत्कार आपल्यावर आघात करील तेव्हां पाहूं, अशी वाट पहात बसण्याऐवजीं ती चमत्काराची शिकार शोधूं लागते. आणि सृष्टींत चमत्काराला काय तोटा? खगोलाप्रमाणेंच पृथ्वीवरच्या वस्तूवस्तूंचे धर्म चमत्कारांनीं भरलेले आहेत, सृष्टींत नित्य चालू असणाऱ्या रासायनिक क्रियाःप्रतिक्रियाहि विस्मयकारक आहेत, रत्नाकराच्या पोटांत आणि पृथ्वीच्या पोटांतहि अनंत चमत्कार आहेत, आणि वनस्पती, पशुपक्षी आणि स्वतः मानव प्राण्याचें शरीर हीं सारीं मति कुंठित करणारीं गूढें आहेत! या सर्व चमत्कारांचें आव्हान मनुष्याची बुद्धि स्वीकारते, आणि पदार्थशास्त्र, रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र आणि शारीरशास्त्र अशा शास्त्रांची मालिका अनुक्रमानें तयार होत जाते.

मग अशी एक घटका येते, कीं त्या वेळीं मनुष्य स्वतःला विचारतो, हीं सारीं शास्त्रें मी निर्माण केलीं खरीं, पण ज्या शक्तीच्या सहाय्यानें मी तीं तयार करूं शकलों त्या माझ्या अंतर्यामींच्या मानसशक्तीचा पद्धतशीर अभ्यास अजून मी केलाच नाहीं; ज्या मनाच्या सामर्थ्यानें मी हें सारें ज्ञान संपादिलें त्या मनाचें नीटसें ज्ञान मी अजून करून घेतलेंच नाहीं! मग आतां त्याच शास्त्राकडे वळूं. मनुष्य स्वतःशीं हा बेत करतो त्या वेळीं मानसशास्त्राचा उदय होतो.

कोठल्याहि देशांत मानसशास्त्रावाचून शेकडों वर्षें कशीं जातात, व त्या शास्त्राची सिद्धता फार उशीरां कां होते तें या चर्चेवरून दिसून येईल. मानसशास्त्र हें केव्हांहि, कोणत्याहि राष्ट्रांत, वयानें इतर शास्त्रांहून पुष्कळच लहान असतें. पण आपल्या हिंदुस्थानांत तर तें जन्मास उशीरां आलें येवढेंच नव्हे तर तें जन्मास आलें तेंच क्षीणावस्थेंत आलें, आणि पुढें लवकरच तें मृतप्राय झालें. त्यामुळें आधींच माणसाला मानस-शास्त्रीय दृष्टीनें मानवी व्यवहाराकडे पाहण्याचा उल्हास फार आणि त्यांतून त्या शास्त्रावरील उपलब्ध चर्चेचा फाल्गुन मास झाला! त्यामुळें आम्हां हिंदुस्थानांतील लोकांना मानसशास्त्राविषयींच्या गाढ अज्ञानांत रहावयाची संवय झाली.

पाश्चात्य देशांत मानसशास्त्राचा उदय व्हावयास अवधि लागला खरा; पण तें एकदां उदित झाल्यावर त्याची वाढ झपाट्यानें होत गेली. गेल्या पन्नास साठ वर्षांत तर या शास्त्रावरील चर्चेला व वाङ्मयाला इतका बहर आला आहे कीं आपल्याकडे जशीं आत्मविद्येचीं षड्दर्शनें आहेत तशीं यूरोप अमेरिकेंत मानसशास्त्राचीं सहाच काय, दहा वीस दर्शनें ( Schools of Thought ) निर्माण झालीं आहेत; व इतर सर्व शास्त्रांच्या डोल्यावर हें शास्त्र बसणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत.

उलट, आपल्याकडे मानसशास्त्राची चर्चा कोणाला माहीतहि नाहीं. पूर्वी संस्कृत वाङ्मयांत या शास्त्राबद्दल जी कांहीं थोडी चर्चा झाली तेवढीच. ती तितक्यावरच थांबली, आणि या शास्त्राची परंपरा पार नाहींशी झाली. इतकेंच नव्हे तर संस्कृत वाङ्मयांत सांपडणारी

चर्चादेखील अशा विकृत वृत्तीनें केलेली, कीं ती वृत्ति जे स्वीकारतील त्यांना पुढें या शास्त्राकडे लक्ष देण्याची इच्छाच राहूं नये. या शास्त्रांत लक्ष घालण्यांत त्यांना कमीपणा वाटावा. वैदिक वाङ्मयांत मानसशास्त्रविषयक कांहीं सूत्रें अधून मधून आढळतात. पण त्यांना सुसंगत चर्चेचें स्वरूप नाहीं. पातंजलयोगालाच फार तर आपल्याकडील मानसशास्त्रावरील ग्रंथ अशी संज्ञा देतां येईल. परंतु हा ग्रंथ अशा वृत्तीनें लिहिलेला दिसतो कीं जणूं माणसाचें मन म्हणजे एक त्याच्या मोक्षाच्या आड येणारी एक मोठी उपाधि आहे. ध्यानधारणादि साधनांच्या योगानें या उपाधीचें निर्मूलन कसें करतां येईल तें ठरविण्याच्या व सांगण्याच्या हेतूनेंच पातंजलयोगाचा अवतार झालेला दिसतो.

आपल्या मनाला शत्रुस्थानीं लेखण्याची पातंजलयोगांत दिसणारी वृत्ति आम्हां हिंदूंच्या अंगीं शतकानुशतकें मुरत आली आहे. त्यामुळें मनाच्या स्थूल व सूक्ष्म व्यापारांचा अभ्यास करण्याची बुद्धि आम्हांला होणेंच शक्य राहिलें नाहीं. कुत्र्याला पिसाळलेलें ठरवावें आणि मग खुशाल जिवें मारावें, अशी इंग्रजींत एक म्हण आहे. तसेंच आपण मानवी मनाच्या व मानवी स्वभावाच्या बाबतींत आज हजारों वर्षें वागत आलों आहोंत. माणसाच्या मनाचें व स्वभावाचें काळेंकुट्ट चित्रच आपले हरिभक्त, साधुसंत, तत्वज्ञानी, कवी सदा काढीत आले. मनुष्याची वृत्ति स्वभावतः पापाकडे आहे असें म्हणतां म्हणतां, आपण असेंहि म्हणूं लागलों कीं माणसाला जें जें स्वाभाविकपणें करावेसें वाटतें तें तें पापच असलें पाहिजे. या विकृत कल्पनेवरच आपण आपलें नीतिशास्त्र आणि धर्म यांची स्थापना केली जें स्वाभाविक तें अनीतीचें, आणि जें करावयास माणसाला आपल्या सहज प्रवृत्तीचा उच्छेद करावा लागून यातना सोसाव्या लागतात तेंच नीतीचें अशी कल्पना आपल्या रोमरोमांत भिनत गेली.

याचा परिणाम असा झाला कीं, मानसशास्त्राचा विचार आपल्याकडून कधीं झाला नाहीं. जें मानवी मन दुष्ट, पापी, उद्धाराच्या आड येणारें, त्याचा अभ्यास कोण कशाला करणार? मनाचा निरोध करून

समाधि साधायची येवढें ठरल्यावर, ज्याचा निरोध करायचा त्याच्या अध्ययनांत कोण वेळ वाया घालविणार? जें गाडून टाकायचें तें निरखून कशाला पाहायचें? बागेंतल्या सुंदर कलमांच्या वाढीला व्यत्यय करणारें रानगवत ओरबाडून टाकतांना बागवान त्याच्या रंगरूपाचा अभ्यास कां करणार आहे? मानवी स्वभाव दडपून मारून टाकायचा ही एकच मोक्षाची दिशा म्हटल्यावर साहजिकपणेंच त्या स्वभावाबद्दल कांहीं आस्था वाटणें शक्य नाहीं. त्यामुळें मानवी मनोव्यापारांचें, आणि त्या मनोव्यापारांच्या प्रेरणेनें घडणाऱ्या वैयक्तिक व सामाजिक व्यवहाराचें अध्ययन करण्याची इष्टता, व आवश्यकता आपल्याला कधीं समजलीच नाहीं, आणि धर्मप्रसार, अर्थशास्त्र, राजकारण, सामाजिक व औद्योगिक उलाढाली, असले सारे उद्योग मानवी मनाच्या व स्वभावाच्या शास्त्राची कदर न ठेवतां आपण खुशाल चालू ठेवले!

याचे व्हायचे ते दुष्परिणाम झाल्यावांचून राहिले नाहींत. या दुष्परिणामांना सुपरिणाम म्हणायचा हटवाद ज्यांना करायचा आहे त्यांच्याशीं कोण वाद घालणार? पण समाजाची व राष्ट्राची उन्नति खरोखरच साधायची असेल तर त्या हटवादाचा विटाळ आपण आतां यापुढें टाळला पाहिजे. मनाचे नैसर्गिक धर्म, त्याचे व्यापार, त्याच्या हालचालीचे नियम तुच्छ न समजतां त्यांचा अभ्यास केला पाहिजे. पाश्चिमात्यांनीं जो अभ्यास केला आहे तो देशाभिमानाची खोटी समजूत टाकून आत्मसात् करून घेतला पाहिजे. मनाशीं शत्रुत्व न करितां त्याचे गुणधर्म ओळखण्यास व त्याचा आपल्या हिताकडे उपयोग करून घेण्यास शिकलें पाहिजे. मासळीनें पाण्याशीं वैर धरावें, आणि त्याचा त्याग करून जमिनीवर संचार करण्याची महत्त्वाकांक्षा दाखवावी यांत शहाणपणा कोठला? पाण्याचा स्वभाव आणि त्याचे गुणधर्म तिनें ओळखावे, आणि त्यांत सुखानें विहार करावा हेंच केव्हांही योग्य ठरेल!

खरोखरच मासळी आणि पाणी यांचा जो अनोन्य संबंध आहे तोच आपण सारीं माणसें आणखी आपआपलीं मनें यांचा आहे. आहारविहारासारख्या सामान्य गोष्टीपासून तों राष्ट्राराष्ट्रांत माजणाऱ्या युद्धापर्यंतचे आपले सारे व्यवहार विवक्षित रीतीनें घडून येतात ते

त्याच्या बुडाशीं विवक्षित स्वरूपाचे मनोव्यापार असतात म्हणून. व्यक्तींव्यक्तींतलीं लोभाचीं अगर रागाचीं नातीं, उत्तरेंदुरुत्तरें, बोलणीं अगर रुसणीं फुगणीं, यशापयश व त्यांतून उद्‌भवणारीं सुखदुःखें, सामाजिक जीवनांतल्या औद्योगिक खटपटी, राजकारणांतले लढे, धर्मविषयक क्रांत्या—साऱ्यांचा उद्भव मनोव्यापारांतून होत असतो. याबद्दल विचार करीत बसलें कीं पुष्कळदा मनांत येतें, कीं समजा कांहीं अतर्क्य चमत्काराच्या योगानें पृथ्वीवरच्या माणसांचीं मनेंच नष्ट झालीं तर आज मानवी व्यवहाराचा जो अफाट पसारा चार खंडें व्यापून पसरलेला आहे त्यांत केवढी क्रांति होईल ! माणसाला घरादारांची गरज राहणार नाहीं, आप्तेष्टांचें प्रेम उरणार नाहीं, पैसे मिळवावे व सांठवावे असें वाटणार नाहीं, शिक्षणाची हौस उरणार नाहीं, करमणूक हवीशी वाटणार नाहीं, घरेंदारें, शाळा कॉलेजें, कचेऱ्या, बॅंका, दुकानें, देवालयें, नाटकगृहें, सगळ्यांचीं दारें कायमचीं बंद होतील; आणि सामाजिक आणि राष्ट्रीय जीवन पार आटून नाहींसें होईल ! सारा संसार म्हणजे केवळ मनानें मान्य केलेली माया आहे, असें म्हणण्याचा वेदांती लोकांचा परिपाठ आहे त्यांतली तुच्छतेची छटा बाद केली तर त्या विधानांत फार खोल अर्थ भरलेला आहे असें म्हणावें लागेल खरोखरच संसारांतल्या लहानमोठ्या सर्व गोष्टींचें बीजकारण म्हणजे मानवी मनाचे व्यापार होत.

म्हणून समाजांतल्या प्रत्येक प्रौढ व्यक्तीस मानसशास्त्राचें ज्ञान असणें अगत्याचें आहे. त्या ज्ञानाच्या अभावीं व्यक्तीव्यक्तींत वृथा गैरसमज माजतात आणि सामाजिक व राष्ट्रीय जीवनाची घडण भलत्याच तत्त्वांवर करण्याचा प्रमाद आपल्या हातून घडून मग नानाविध आपत्ति भोगाव्या लागतात. असल्या आपत्ति आजवर आपण कांहीं थोड्या भोगल्या नाहींत. तेव्हां यापुढें तरी आपल्याला डोळसपणा यावा म्हणून समाजांतल्या प्रत्येक स्त्री-पुरुषास मनोव्यापारांचें शास्त्रीय ज्ञान प्राप्त करून दिलें पाहिजे; आणि हा उपक्रम आपण यथामति करावा येवढ्याच हेतूनें मी लेखणी हातीं घेतली आहे.

---

## प्रकरण २ रें

मनोव्यापारांचा अभ्यास करावयाचा आपण बेत केला, कीं प्रारंभींच एक अडचण उपस्थित होते, व सकृद्दर्शनीं त्या अडचणींतून कांहीं तोड काढतां येईलसें वाटत नाहीं. एक तर असें कीं, ज्या मनाचा आपण अभ्यास करणार तें दुसऱ्या कोणा व्यक्तीचें असून चालणार नाहीं. कारण त्या मनापर्यंत आपली गति होणार कशी? कोणाचेंहि मन म्हटलें कीं तें आंत कोठें तरी लपलेलें असणार. तें अदृश्य आणि गुप्तच राहणार. अमुक माणूस अगदीं मोकळ्या मनाचा आहे असें आपण व्यवहारांत म्हणतों खरें; पण त्याचा अर्थ असा थोडाच आहे कीं, एखादें कुत्रें मोकळें असावें व हिंडतांना कोणीहि पहावें तसें त्या माणसाचें मन आहे? "मोकळ्या मनाचा", "उघड्या अंतःकरणाचा" असे शब्दप्रयोग आपण वापरतों ते केवळ लक्षणार्थानें. लोकांचीं मनें आपल्याला कधीं प्रत्यक्ष जाणतां यायचीं नाहींत, त्या मनांच्या व्यापारांविषयीं आपल्याला फार तर अनुमानात्मक विधानें करतां येतील, हें आपल्यापैकीं प्रत्येकजण पूर्णपणें जाणून आहे.

अर्थात् ज्याला मनाचा अभ्यास करावयाचा असेल त्यानें स्वतःच्याच मनाची त्यासाठीं निवड केली पाहिजे. पण मनुष्य कोणत्याहि विषयाचा जेव्हां अभ्यास करतो, तेव्हां तो आपल्या मनाच्या सहाय्यानेंच तो करीत असतो. खगोल, भूगोल अशा विविध विषयांचें ज्ञान करून घेतांना माणसाचें मोठें साधन म्हणजे त्याचें मन. या साधनावांचून त्याच्यानें कसलेंच अवलोकन अगर अध्ययन होणें शक्य नाहीं. पण आतां माणसानें आपल्या मनाचा अभ्यास करावयाचा म्हटलें कीं जें त्याचें मन त्याला नेहमीं "साधन" म्हणून उपयोगीं पडतें तें बनणार त्या अभ्यासाचा "विषय", आणि असें झाल्यावर अभ्यासाचें "साधन" कोठें उरलें? बरें "साधन" म्हणून मन राखून ठेवलें तर "विषय" व्हावयास उपयोगीं पडेल असें मन कोठें

उरणार ? म्हणजे अभ्यासाचा विषय आहे तर साधन नाहीं व साधन आहे तर विषय नाहीं, अशी विचित्र अनवस्था होते आणि या अनवस्थेंतून कांहीं मार्ग नसेल तर मानसशास्त्र कितीहि थोर असलें तरी त्याची सिद्धता शक्य कोटींतली नाहीं असें म्हणायची पाळी येते.

बाह्य सृष्टींतले पदार्थ जाणायचे झाले, कीं आपण आपलें चित्त त्यांवर एकाग्र करतों व तसें केलें कीं आपला कार्यभाग साधतो; पण आतां या चित्तावेंच ज्ञान करून घ्यायचें म्हणजे मोठी पंचाईत आहे. समजा, आपण कालिदासाचें मेघदूत काव्य वाचीत आहोंत. तें काव्य आपणांस उत्तम समजून घ्यायचें असेल, व त्याचा रसास्वाद पूर्णांशानें उपभोगायचा असेल, तर आपण काय करूं ? एकाग्र चित्तानें तें वाचूं. पण उलट असें समजा, कीं कालिदासाच्या काव्याचें नव्हे, तर आपण ज्या अवस्थेस आपल्या चित्ताची एकाग्रता असें नांव देतों, तिचेंच स्वरूप आपल्याला समजून घ्यायचें आहे. तें घ्यावयाचें असेल तर आपल्या चित्ताच्या एकाग्रतेकडे आपल्याला थोडेसें चित्त दिलें पाहिजे हें उघडच आहे. परंतु हें करणें जितकें अवश्य आहे तितकेंच अशक्य आहे ! कारण मेघदूत काव्यावर आपण आपल्या चित्ताची केलेली एकाग्रता खरोखरीच एकाग्रता या संज्ञेस केव्हां पात्र होईल ? जेव्हां आपल्या चित्ताचा यत्किंचित्‌हि अंश त्या काव्याखेरीज दुसऱ्या कोठेंहि गुंतलेला नसेल तेव्हां ! पण असें झालें म्हणजे एकाग्रतावस्था सिद्ध होईल हें जितकें खरें, तितकेंच हेंहि खरें, कीं त्या अवस्थेकडे द्यावयास आपल्याजवळ चित्त शिल्लकच उरणार नाहीं ! बरें, चित्ताचा थोडासा अंश जरी आपण मुद्दाम राखून ठेवला तरी मग मेघदूतावर आपल्या चित्ताची खरी एकाग्रता होणें अशक्य होऊन बसेल ! कारण, आधींच आपण चित्ताचा, थोडा कां होईना, भाग आपल्या कामासाठीं निराळा काढून ठेवला तर मग मेघदूताकडे आपलें चित्तसर्वस्व देणें आपल्यास कसें शक्य होणार ? म्हणजे एकाग्रता हा मनोधर्म असा विलक्षण आहे, कीं ज्या वेळीं तो प्रगट होईल त्या वेळीं त्याचा अभ्यास करावयास आपल्याजवळ मनःशक्तीच शिल्लक राहणार नाहीं; व ज्या

वेळीं त्याचा अभ्यास करण्याचा आपण बुद्धिपुरःसर उपक्रम करूं त्या वेळीं तो मनोधर्म प्रगटच होणार नाहीं !

या व असल्याच इतर अडचणींचा विचार केला, कीं वाटतें मानसशास्त्र बनविणें शक्य नाहीं. त्या शास्त्राचा विषयच असा चमत्कारिक कीं त्याला अध्ययनाच्या हेतूनें आपण स्पर्श करावयासाठीं केलेली धडपड वांया जावी. एका उंटावरच्या शहाण्यानें दुसऱ्या शहाण्यास विचारलें, कीं ' अंधार कसा असतो तो मला नीट लख्ख प्रकाशांत दाखवितोस कां ? ' दुसरा म्हणाला, ' हो, त्यांत काय मोठें कठिण आहे ? अरे, अमावास्येच्या मध्यरात्रीं अंधारानें भरलेल्या तळघरांत मशाल पेटवून हातीं घेऊन आपण शिरूं म्हणजे आपल्याला अंधार पाह्यला मिळेल हवा तेवढा ! ' मग तो प्रयोग त्या दोघां शहाण्यांनीं करून पाहिला. पण त्यांची ती भानगड कांहीं केल्या जमेना. मानसशास्त्रहि असल्या भानगडीपैकींच आहेसें प्रथमदर्शनीं वाटूं लागतें. आपलें मन हाच अभ्यासाचा विषय, आणि आपलें तेंच मन त्या अभ्यासाचें साधन हा योग साधण्याची कांहीं आशा दिसत नाहीं !

परंतु याबद्दल जरा अधिक विचार केला तर असें दिसून येईल कीं, आपल्याला अगदीं निराश होण्याचें कारण नाहीं. एक तर असें कीं आपल्या मनाची एकतानता अगर समाधि ही एकच अवस्था संभवते असें नाहीं. उलट आपल्या मनाचे पुष्कळसे—नव्हे बहुतेक—व्यापार असे असतात, कीं ते चालू असतांना आपलें मन त्यांत सर्वस्वीं गुंतलेलें नसतें. आपण चित्र पाहतों, गाणें ऐकतों, हर्ष, खेद, लोभ, द्वेष, अगर पश्चात्ताप करतों, कांहीं एक निश्चय करतों, अथवा केला असून मोडतों, दुसऱ्याची निंदा अगर स्तुति करतों, त्या त्या वेळीं त्या त्या कृतींत आपलें मन सर्वस्वीं गुंतलेलें नसतें. ती ती कृति आपल्या हातून घडत असतां तिच्याकडे आपलें अवधान तर असतेंच, पण तें अवधान देऊनच्या देऊन आपल्या चित्ताचा थोडा फार भाग शिल्लकच उरलेला असतो, व आपल्याला वाटल्यास या अवशिष्ट मनाच्या सहाय्यानें आपल्या कार्यव्यापृत मनाच्या व्यापाराकडे नीट लक्ष देणें शक्य असतें.

गाणें ऐकून हृष्ट झालेल्या आपल्या मनाचें आपल्या अवशिष्ट मनानेंच त्या क्षणीं अवलोकन करतां येतें. लोभ करणाऱ्या आपल्या मनाचा व्यापार पाहून आपल्या मनानेंच त्याची निर्भर्त्सना आपण कित्येक वेळां करीत नाहीं का ? प्रेमपाशांत गुंतलेल्या आपल्याच मनाला जणूं त्या पाशाव्यतिरिक्त राहिलेल्या अशा दुसऱ्या एका आपल्या मनानें आपणच त्या वेडेपणापासून परावृत्त करीत नाहीं काय ? खेद करणाऱ्या आपल्या मनाला आपलेंच अवशिष्ट मन चार समजुतीच्या गोष्टी पुष्कळदां सांगतेंच कीं नाहीं ? आणि पापाचरणास उद्युक्त झालेल्या आपल्या मनाला पहिला इशारा आपल्याच अवशिष्ट मनाकडून मिळतो ना ?

" त्याचें एक मन त्याला असें म्हणालें " व " त्याचें दुसरें मन त्याला तसें म्हणालें " असली भाषा आपण गोष्टींत अगर कादंबऱ्यांत वापरतों. त्या भाषेंतला अभिप्राय तरी हाच, कीं माणसाचें मन अनेक प्रसंगीं स्वतःच्या व्यापारांचें अवलोकन व पृथक्करण करीत असतें, इतकेंच नव्हे तर स्वतःच्या त्या व्यापारांची युक्तायुक्तताहि ठरवीत असतें. ज्या वेळीं एखाद्या मनुष्यास एखादा अत्यंत महत्वाचा निश्चय करावयाचा असतो, त्या वेळीं कादंबरी लिहिणारे त्याच्या मनःस्थितीचें वर्णन कसें करतात ? ते म्हणतात " त्याच्या मनाची द्विधा स्थिति झाली ". म्हणजे असें, कीं त्या माणसाचें मन विवक्षित प्रकारचा निश्चय करण्यांत गुंतलें होतें, व त्याच वेळीं त्याचेंच मन त्या निश्चयाच्या व्यापाराची पाहणी करीत होतें. ज्या कृत्याची कार्याकार्यता स्पष्ट ठरलेली नाहीं व ज्या कृत्याचे अंतिम परिणाम काय होतील त्याचा अंदमास करतां येत नाहीं, अशा कृत्याला प्रवृत्त होतांना आपल्याला मनाच्या द्विधा स्थितीचा प्रत्यय हटकून येतो. प्रेमातिशयानें लहानाची मोठी केलेली एकुलती एक कन्या अमक्या स्थळीं द्यावयाची असें ठरवितांना, वडिलोपार्जित आवडतें घर विकावयाला काढतांना, सावकारीच्या धंद्यांत पहिल्यानें शिरून खोट्या हिशेबाचें पहिलें पान लिहितांना, मद्याचा पहिला घोट प्राशन करतांना, प्रिय स्त्रीजवळ

प्रणययाचना करावयाचें ठरवितांना, विरक्तीनें संन्यासाचा निश्चय करतांना, किंवा देशोद्धारासाठीं पंचप्राण यज्ञकुंडांत फेंकण्याची प्रतिज्ञा करतांना—अशा वेळीं माणूस आपल्याच मनानें आपल्याच मनाची पाहणी व तपासणी करीत असतो, याबद्दल वाद नाहीं.

नित्याचे सामान्य मनोव्यापार चालतात ते मात्र असल्या द्विधा मनःस्थितीवांचून. आपण इष्टमित्रांशीं गप्पागोष्टी करतों, अभ्यास करतों, करमणुकींत वेळ घालवतों अगर क्वचित् एखाद्या गोष्टीबद्दल विचार करतों ते मात्र व्यग्रतेशिवाय करतों. पण हे व्यापार आपलें मन द्विधा न होतां आपल्या हातून घडतात, याचें कारण ते व्यापारच अगदीं सामान्य, नित्याचे, ठरीव स्वरूपाचे असतात हें होय. असले व्यापार चालू असतांना मनाची द्विधा अवस्था होण्याची आवश्यकताच नसते म्हणून ती होत नाहीं. ती द्विधा अवस्था शक्य नसते असें नव्हे. ती निर्माण करावयाची म्हटल्यास या सामान्य व्यापारांच्या वेळींहि ती निर्माण करतां येईल. आपल्या मनांत जो जो विचार येईल, जी जी वासना उद्भवेल, व जो जो संकल्प ठरेल, तो तो आपल्याच मनानें लक्षांत घ्यायचा व त्याचें कार्य-कारण शोधायचें असें जर आपण ठरविलें तर तो चाळा आपल्याला चोवीस तास करतां येईल. आपल्या मनामागें आपल्याच मनाचा एक डिटेक्टिव्ह सतत लावून द्यायचा म्हटलें तर तें सहज शक्य आहे.

या सगळ्या चर्चेचा अर्थ असा, कीं मानसशास्त्र बनवायचें झाल्यास ज्या प्रकारचा अभ्यास आपल्या हातून घडला पाहिजे तो आपणांस प्रथमदर्शनीं वाटला तसा असाध्य नाहीं. आपलें मन हाच अभ्यासाचा विषय, आणि आपलें मन हेंच त्या अभ्यासाचें साधन, हा योग वरवर भासतो तितका दुर्घट नाहीं.

शिवाय, आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही, कीं आपल्या मनाच्या व्यापारांचें अवलोकन करावयाचें झाल्यास ते घडत असतांना त्या क्षणींच त्याकडे लक्ष देणें हा जसा एक संभवनीय मार्ग आहे, तसाच दुसराहि एक मार्ग आहे, व तोहि पुष्कळच उपयुक्त ठरण्या-सारखा आहे. तो मार्ग असा, कीं ज्या मनोव्यापारांचा आपल्याला

अभ्यास करावयाचा असेल ते घडत असतांना निर्वेध घडूं द्यायचे, आपल्या चवकस चित्ताला त्यांत त्या क्षणीं कांहीं ढवळाढवळ करूं द्यायची नाहीं, पण ते घडून गेले कीं लगेच लक्षणार्थानें मागें पाहून आपल्या जिज्ञासू बुद्धीचे किरण त्यांवर फेंकायचे, व त्यांचें स्वरूप समजून घ्यावयाचें.

समजा, एखाद्या माणसाचा स्वभाव फार तापट आहे. त्याला झट्कन् संतापाची लहर येते. ही त्याची लहर थोडा वेळच टिकते, व ती संपली कीं त्याचा उदार, प्रेमळ स्वभाव पुन्हा प्रगट होऊन ज्यावर त्यानें संतापून कटुवचनांचा वर्षाव केला असेल त्यालाच तो प्रेमानें शातही करतो. असल्या स्वभावाचीं माणसें पुष्कळ असतात. अशा माणसांपैकीं एकाचें उदाहरण घेऊं. समजा, या माणसाला आपल्या शीघ्रकोपी मनाचें सूक्ष्म अवलोकन करायचें आहे, व शक्य तर आपल्या स्वभावातील हें वैगुण्य काढून टाकावयाचें आहे. हें साधावयाचें झाल्यास दोन वेगवेगळ्या रीतींनीं त्याला तें साधतां येईल. एक रीत अशी, कीं ज्या क्षणीं त्याचें मन संतापाच्या वावटळींत सांपडेल त्याच क्षणीं आपल्या अवशिष्ट मनाची नजर त्यानें त्यावर टाकावी. त्या संतापाच्या क्षणांत आपल्या मनाचे सारे व्यापार कसे प्रमाणशून्य होतात, आपल्या साऱ्या मृदु भावना कशा नष्ट होतात, आपला युक्तायुक्तविवेक कसा सुटतो, इत्यादि गोष्टींचें आपल्या अवशिष्ट, साक्षीभूत मनानें त्यानें टिपण करावें. किंवा, दुसरी रीत अशी, कीं संतापाची लाट आली, आणि गर्जायची व खळबळायची तितकी गर्जून व खळबळून ओसरली, कीं मग लगेच त्यानें तिच्याकडे बारीक व शोधक नजरेनें चित्त द्यावें. आपल्या संतापाला कारण काय घडलें, त्या कारणामुळें आपल्या मनांत कोणकोणते विकार एकदम उद्भवले, ते विकार उद्भवावेत हें योग्य होतें काय, त्या विकारांऐवजीं दुसऱ्या वेगळ्याच सद्भावना आपल्या अंतःकरणांत येणें अशक्य होतें काय, व अशक्य नव्हतें तर त्यांचा मार्ग आपल्या कोणत्या प्रमादामुळें बंद झाला होता, इत्यादि प्रश्नांचें संशोधन त्याला मग करतां येईल.

सारांश, आपल्या मनोव्यापारांचा अभ्यास करावयाचा झाल्यास अभ्यासाच्या दोन रीती संभवतात. ज्या क्षणीं मनोव्यापार घडत असेल त्याच क्षणीं अवशिष्ट मनानें त्याचें प्रत्यक्ष, समोरासमोर, सम्यक् दर्शन घ्यावयाचें ही एक रीत; किंवा विशिष्ट मनोव्यापार घडून गेल्याबरोबर सिंहावलोकन केल्याप्रमाणें मान वळवून त्याचें पाठमोरें दर्शन घ्यावयाचें ही दुसरी रीत. पहिल्या प्रकारास **सम्यग्दर्शन,** व दुसऱ्या प्रकारास **अनुदर्शन** अशीं नांवें मी देतों.

मनोव्यापारांचा अभ्यास करावयाचें आपण ठरविल्यास या दोन रीतींचा आपणांस फार उपयोग करून घेतां येईल. इतकेंच नव्हे, तर अभ्यासाची आणखी एक तिसरी रीतही संभवते, व तीदेखील अतिशय फलप्रद होण्यासारखी आहे. आपण आपल्या मनोव्यापाराचें शक्य तेवढें सूक्ष्म निरीक्षण करणार तें शास्त्र बनविण्याच्या हेतूनें. आपल्या वैयक्तिक मनाचा अभ्यास हाच त्या शास्त्ररचनेचा खरा प्रारंभ यात तर शंकाच नाहीं; परंतु तो केवळ प्रारंभ होय, तो अखेरचा मुक्काम नव्हे हेंही विसरतां कामा नये. माझ्या मनाच्या व्यापाराची अशी तऱ्हा आहे एवढेंच अभ्यासांतून आपण सार काढलें तर तेवढ्यानें खरी शास्त्रसिद्धि होणार नाहीं. सामान्यपणें साऱ्या माणसाच्या मनोव्यापारास अमुक अमुक नियम लागू आहेत असें आपणांस विधान करता आलें तरच मानसशास्त्राची सिद्धता आपल्या हातून होईल. एखाद दुसऱ्या वस्तूचा धर्म ओळखल्यानें शास्त्र बनत नाहीं. त्या जातीच्या वस्तुमात्रास लागू पडणारा सिद्धांत सांगतां आला तरच शास्त्र निर्माण होतें. ज्यानें गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढला त्यानें जर एवढेंच म्हटलें असतें, कीं जें विवक्षित फळ झाडावरून पडलेलें मी पाहिलें तेव्हापुरतें मी सांगतों कीं, पृथ्वीनें त्यास आपल्याकडे खेंचलें म्हणून ते पडलें, तर त्याच्या त्या म्हणण्याला कोणीं फारशी किंमत दिली नसती. परंतु त्यानें विधान केलें तें तेवढ्या एकाच फळाबद्दल नव्हे तर जड प्रकृतीच्या एकंदर पदार्थमात्राबद्दल केलें, व म्हणून त्याला शास्त्राचें मोल प्राप्त झालें. या न्यायानें पाहतां आपल्या स्वतःच्याच मनोव्यापारांबद्दल नव्हे, तर सामान्यपणें साऱ्याच

मानवी व्यक्तींच्या मनोव्यापारांबद्दल आपल्याला कांहीं नियम बांधतां आले तरच शास्त्रघटनेचा आपला हेतू सिद्धीस जाईल. माझ्या विचारविकारांचे कार्यकारणसंबंध अमुक प्रकारचे आहेत येवढेंच म्हणण्याऐवजीं आपल्याला जर असें सांगतां आलें, कीं हे कार्यकारण-संबंध माझ्या एकट्याच्या मनोव्यापारांपुरतेच दिसून येतात असें नव्हे, तर सामान्यपणें मानवी मन म्हटलें कीं तेथें याच कार्यकारणनियमांचा अंमल चालतो, तरच आपल्या चर्चेच्या निष्कर्षास शास्त्र ही संज्ञा शोभेल.

यासाठींच आत्मनिरीक्षणाचे सम्यग्दर्शन व अनुदर्शन हे जे दोन प्रकार सांगितले त्यांस अभ्यासाच्या आणखी एका तिसऱ्या प्रकाराची जोड देणें आवश्यक आहे. तो प्रकार हा, कीं अनेक अभ्यासकांनीं एकत्र यावयाचें व आपापल्या अनुभवांशीं इतरांचे अनुभव ताडून पहावयाचे. जीं शास्त्रें केवळ तर्कानें नव्हे तर अनुभवानें बनावयाचीं असतात त्या सर्वांतच अनेक अभ्यासकांच्या साक्षींचा समवाय म्हणजे एक फार मोठें प्रमाण मानलें जातें. विस्तवानें हात भाजतो असें एका व्यक्तीनें म्हणून उपयोग नसतो. सहस्रावधि व्यक्तींनीं तीच साक्ष दिली म्हणजे मात्र " दहनशीलो वन्हिः । " असा सिद्धान्त मांडतां येतो. तद्वतच मनोव्यापारांच्या बाबतींत अनेक अभ्यासकांच्या आत्मनिरीक्षणांचा मेळ बसणें आवश्यक आहे. म्हणजे असें, कीं प्रत्येक जिज्ञासूनें सम्यग्दर्शन व अनुदर्शन या दोन मार्गांनीं आत्मनिरीक्षण करावें आणि नंतर अशा अनेक व्यक्तींच्या आत्म-निरीक्षणांत ज्या सामान्य गोष्टी उघड होतील त्यांच्या साहाय्यानें नियम बसवावे, हाच मानसशास्त्र बनविण्याचा राजमार्ग होय.

निदान पाश्चात्य संशोधकांनीं तरी मानसशास्त्र बनवितांना अगदीं परवां परवांपर्यंत याच मार्गाचा अवलंब केला. ' परवां परवांपर्यंत ' असें म्हटलें पाहिजे याचें कारण असें, कीं मनोव्यापारांच्या संशोधन-साधनांत अलिकडे मोठी क्रांति होऊं पहात आहे. आतांपर्यंत या प्रकरणात मीं जी चर्चा केली तिच्यावरून वाचकांस हें पटलें असेल कीं, मनोव्यापारांचें संशोधन प्रथम वाटतें तसें अशक्य जरी नाहीं तरी

त्या संशोधनाचीं साधनें मर्यादित आहेत. आत्मनिरीक्षण व अनुभव-संवाद यापलीकडे कोणतेंच साधन मानसशास्त्राच्या क्षेत्रांत वापरतां येण्यासारखें नाहीं. दूरचा तारा साध्या दृष्टीला नीट दिसत नसला तर ज्योतिर्विद जशी मोठ्या शक्तीची दुर्बीण लावून त्या ताऱ्याचा वेध घेतो, तसें कांहीं आपल्या मनाचें अवलोकन करतांना आपल्याला करता येणें शक्य नाहीं. भिन्न भिन्न रसायनें एका नलिकेंत घालून त्यांचे गुणधर्म रसायनशास्त्री ठरवितो, तसलाही प्रयोग आपल्या मनोव्यापारांवर आपणांस करतां येणार नाहीं; किंवा पदार्थांच्या वजनाचीं व घनतेचीं उदाहरणें भराभर कागदावर मांडणाऱ्या पदार्थविज्ञान-वेत्त्याप्रमाणें मनोधर्मांच्या गणितांची आंकडेमोडही संभवनीय नाहीं. याचा अर्थ असा, कीं मानसशास्त्राचा विषयच असा चमत्कारिक, कीं त्यांत आंकड्यांचा, कांट्यातराजूंचा, वजनामापांचा, दुर्बिणीसारख्या उपकरणांचा आणि प्रयोगशाळाचा कांहीं एक उपयोग नाहीं ! तो विषय प्रयोगशाळांच्या पलीकडचा आहे !

परवां परवांपर्यंत जगाची अशी समजूत होती; पण आतां त्या समजुतीस मोठाच धक्का बसला आहे. पाश्चात्य मानसशास्त्र्यांनीं आपल्या शास्त्रातले कित्येक प्रश्न प्रयोगशाळेंतल्या उपकरणांच्या सहाय्यानें सोडविण्याची खटपट सुरू केली आहे, व त्यांत त्यांना अधिकाधिक यशहि येत आहे. " प्रयोगसाध्य मानसशास्त्र " नांवाचें मानसशास्त्राचें एक महत्त्वाचें उपांगच सर्वमान्य होऊं पहात आहे. अमेरिकेंतल्या व जर्मनींतल्या मानसशास्त्रीय प्रयोगशाळांची उपयुक्तता पटल्यामुळें पुढारलेल्या सर्वच देशांत अशा प्रयोगशाळांची संस्थापना झाली आहे, व तेथें महत्वाचे प्रयोग चालू आहेत. माणसाची संवेदनशक्ति मापण्याचीं यंत्रें निघालीं आहेत, स्वप्नांची मीमांसा केली जात आहे, कोणत्या ग्रंथींच्या व्यापारांवर कोणत्या मानवी भावना अवलंबून आहेत त्याचा निर्णय होत आहे, मानवी स्मृति तराजूंत जोखली जात आहे, संकल्पशक्तीच्या बुडाशीं जी कूटरचना आहे तिची उपकरणांच्या साहाय्यानें उकल होत आहे, प्रणयासारख्या नाजूक स्वैरभावाचें देखील गणित मांडून दाखविण्याचें धाष्टर्य

केलेलें दिसत आहे—थोडक्यांत म्हणजे, एखाद्या बेडकाला धरून, त्याचे हातपाय टांचण्यानीं ताणून, त्याची चीरफाड करावी तशीच मानवी मनाची अवस्था करून टाकण्याचा संशोधकांचा बेत आज दिसतो !

क्षणभर खरीही वाटूं नये अशी ही अद्भुत गोष्ट आहे. ज्या या प्रकरणाच्या प्रारंभीं मानवी मनोव्यापारांचा अभ्यास करणें किती दुर्घट आहे त्याचें मी दिग्दर्शन केले, त्याच प्रकरणाच्या अखेरीस विसाव्या शतकांतल्या संशोधकानीं मानवी मनाला प्रयोगशाळेंत सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं धरल्याचा वृत्तात मी सांगावा, हें नवलाचें वाटेल ! पण ज्ञानाला अंत नाहीं त्याप्रमाणें माणसाच्या ज्ञानलालसेला, आणि त्याच्या साधननिर्मितीला अंत नाहीं हेंच खरें ! तें कसेंही असो, आत्मनिरीक्षण, अनुभवसंवाद, प्रयोगशाळेंतील प्रत्यक्ष प्रयोग, अशा विविध साधनांनीं पाश्चात्य लोकानीं मानसशास्त्राचें वैभव कल्पनेपलीकडे वाढविलें आहे येवढें खरें. हे वैभव जसजसें वाढलें तसतसा त्या शास्त्राच्या क्षेत्रांत मतामताचा गलबलाही वाढला आहे. आपल्याला तो सारा गलबला ऐकण्याचें प्रयोजन नाहीं. सामान्यपणें आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनास उपयोगी पडतील असे कोणकोणते सिद्धांत, व कोणकोणतीं तत्त्वें ठोकळ मानानें सर्वमान्य झालीं आहेत तें आपल्याला पहावयाचें आहे. त्या चर्चेस पुढील प्रकरणांत प्रारंभ करूं.

————

# प्रकरण ३ रें

मनाच्या गुणविशेषांचें आणि व्यापाराचें निरीक्षण करतांना एका भ्रामक समजुतीची बाधा टाळली पाहिजे. ती समजूत ही, कीं मानवी मन आणि मानवी देह यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नाहीं–असलाच तर केवळ विरोधन्यायानें काय असेल तेवढाच.

वरवर पाहाणारास असें वाटतें, कीं माणसाचें मन त्याच्या देहापासून सर्वस्वी अलिप्त व भिन्न मानलें पाहिजे. साडेतीन हातांचा देह किती म्हटलें तरी जड कोटींतला. माणसाचें जीवित म्हणजे कांहीं केवळ त्याच्या देहाचें आरोग्य आणि चलनवलन नव्हे. किंबहुना, मनुष्य आपल्या देहाविषयीं बोलतांना नेहमीं अशाच आविर्भावानें बोलतो, कीं जणूं तो स्वतःस आपल्या देहाहून भिन्न आणि उच्च मानीत असतो. "माझें अंग गारठलें", "माझा पाय दुखावला", अशा प्रकारेंच मनुष्य आपल्या शरीराचा व शरिराच्या लहानमोठ्या अवयवांचा उल्लेख करतो. आपणा स्वतःस केवळ देहरूप मानावयास तो सहसा तयार नसतो. आपले कपडेलत्ते, घरदार, नोकरमाणसें या जशा आपल्या ताब्यांतल्या व आपल्या मालकीच्या गोष्टी, तसेंच आपलें शरीर. तें आपल्या ताब्यांतलें व आपल्या मालकीचें. आपण त्याचे मालक. आपण त्याहून भिन्न व स्वतंत्र. त्याची सुस्थिति अगर दुस्थिति म्हणजे आपली नव्हे. आपलें एखादें बोट अपघातांत तुटलें, व नाहींसें झालें तरी त्याबरोबर आपणहि नाहींसे होऊं असें थोडेंच आहे? बोटच कशाला, आपला सबंध हात कामास आला तरी "आपण" म्हणून जे कोणी मुळांत तत्त्वतः आहोंत, ते जसेच्या तसे राहूंच कीं नाहीं? आणि याच विचाराच्या दिशेनें आणखी एक पाऊल पुढें टाकलें, म्हणजे असें नाहीं का म्हणतां यावयाचें, कीं आपल्या सबंध देहाचें जरी अवसान झालें तरी "आपण" म्हणून अस्सलांत जें कांहीं आपलें स्वरूप आहे तें अबाधित, व अमृतच राहिलें पाहिजे? आत्म्याच्या

अमरत्वाच्या आणि पुनर्जन्माच्या कल्पना उद्‌भवतात, व लोकांना ग्राह्य वाटूं लागतात त्या असल्या विचारसरणीमुळेंच !

त्या कल्पनांशीं आपल्याला सध्यां कांहीं कर्तव्य नाहीं. आपल्याला येथें एवढेंच ध्यानांत घ्यावयाचें, कीं मानवी देहाकडे व त्या देहाच्या अनेकविध गुणधर्मांकडे क्षुद्र बुद्धीनें पाहण्याचा मोह मानसशास्त्राच्या अभ्यासकास होण्याचा फार संभव आहे. त्या अभ्यासकास असें वाटणें साहजिकच असतें, कीं मला माणसाच्या शारीरिक व्यापारांकडे अगर देहप्रवृत्तींकडे लक्ष देऊन काय करायचें आहे ? त्यांचा अभ्यास शारीर-शास्त्र अगर वैद्यकशास्त्र करील. माझें शास्त्र त्या दोहोंहून भिन्न आहे. मला मानवी मनाचा अभ्यास करावयाचा आहे. मनुष्याच्या देहधर्मांचा विचार मी कशाला करूं ?

मानवी देहधर्माबद्दलची ही अनास्थाबुद्धि मानसशास्त्राच्या अभ्यासकाच्या ठिकाणीं बळावण्यास आणखी एक विचार कारणीभूत होतो तो विचार असा, कीं मनुष्याचे देह-व्यापार त्याच्या मनो-व्यापारांवर अवलंबून असतात. मानवी देह किती झालें तरी जड पंच-तत्त्वांपासून बनलेला. त्याच्या ठिकाणीं स्वयंसिद्ध प्रेरणा नाहीं. माण-साचे पाय कांहीं ठरवूं शकत नाहींत, कीं आतां गति घ्यावी आणि झपा-झप चालावें; किंवा माणसाचा हातहि असा संकल्प करूं शकत नाहीं, कीं म्यानांतून समशेर सप्‌कन् बाहेर काढावी, आणि समोरच्या दुरात्म्याचें मस्तक धडावेगळें करून टाकावें ! अशा संकल्पांचें सामर्थ्य फक्त मनाच्या ठिकाणीं आहे. तेथेंच तें स्फुरण पावतें, आणि योग्य त्या शरीरावयवांस गति देतें. शरीराला दोन पाय आहेत ते चालण्यासाठीं यांत संशय नाहीं. परंतु कोणत्या दिशेनें चालायचें तें त्या पायांना ठरवितां येत नाहीं. तें ठरतें तें मनोव्यापारानुसार. मनाला चीड आली व आवेश चढला तर पाय पुढें चालून जातील. मन भ्यालें व घाबरलें तर पाय उलट दिशेनें पळ काढतील. मनांत राग उसळला तर हाताच्या मुठी वळतील, शोक अनिवार झाला तर हात कपाळावर मारला जाईल ! देहाला कळसूत्री बाहुल्याहून अधिक किंमत नाहीं. त्याचे व्यापार मनांतल्या विविध विचारविकारांवर व संकल्पांवर अवलंबून !

इतकेंच नव्हे, तर देहाचें आरोग्य अगर अनारोग्यदेखील बहुतांशीं मनोव्यापारानुसारच उद्भवतें, असें म्हणण्यास आधार आहे. मन उल्हसित असलें, कीं माणूस चार सहा मैलांची रपेट करूं शकतो, त्याच्या शरिरांतील रुधिराभिसरण उत्तम प्रकारें होतें, त्याला भूक सपाटून लागते, आणि अन्नपचनाच्या बाबतींतहि त्याची कसली तक्रार रहात नाहीं पण तेंच मन शोकाकुल झालें, कीं चार पावलें टाकायचाहि तकवा माणसाच्या अंगीं उरत नाहीं, त्याची अन्नावरची वासना पार उडते, रुधिराभिसरण नीट होत नाहीं, आणि एकंदर देहाची सुस्थितीच नष्ट व्हावयास अवधि लागत नाहीं. अत्यानंदानें माणसास हर्षवायु होतो, भयातिशयानें काळे केंस पांढरे पडतात, आणि अनपेक्षित दुःखाच्या आघातानें एखादे वेळीं माणसाची दृष्टि किंवा वाचा कायमची नाहींशी होते.

या गोष्टींचा विचार करतां साहजिकच असें वाटूं लागतें कीं मनाच्या मानानें मानवी देहाला महत्त्व अगदींच कमी दिलें पाहिजे; किंबहुना, मानवी शरिराचें अगर त्या शरिराच्या प्रवृत्तींचें व व्यापारांचें स्वतंत्र असें अस्तित्वच मानलें नाहीं तरी चालेल.

ही विचारसरणी अत्यंत भ्रामक तर खरीच,–तिच्या फोलपणाबद्दल आपणांस पुढें विचार करावयाचाच आहे–परंतु ती तितकीच साहजिकहि आहे. त्यामुळें तिचा पगडा मानसशास्त्रावर वारंवार बसलेला दिसतो. किंबहुना या समजुतीवर आधारलेल्या विकृत मानसशास्त्राच्या पायावरच जुन्या धर्मसंस्थापकांनीं आचार-धर्माची उभारणी केली असल्याचें आढळतें. बहुतेक धर्मसंस्थापकांनीं मानवी देहाविषयीं व त्या देहाच्या प्रवृत्तींविषयीं उपेक्षा व तिरस्कार आपल्या मनाशीं आधीं दृढ धरून ठेवला, त्या वृत्तीनेंच मानवी मनाच्या गुणधर्माविषयीं विचार केला, आणि त्या विचारानुसारच अध्यात्मज्ञानाचें स्वरूप आणि मार्ग ठरविले, असें म्हणावयास हरकत नाहीं. देह कष्टविल्याखेरीज चित्तशुद्धि होत नाहीं, आणि देहदंडांतून निर्माण झालेल्या चित्तशुद्धीखेरीज निःश्रेयसाची प्राप्ति होत नाहीं, असें गृहित धरूनच आचार-धर्म ठरविला गेलेला प्रायः दिसतो. देहप्रवृत्तींचा उच्छेद हें मनःशांतीचें एकच एक साधन

होय असें देशोदेशींच्या जुन्या शास्त्रकारांनीं मानलें, व तदनुसार त्यांनीं आचार-धर्म घालून दिला.

शास्त्रकारांच्या आज्ञा मेंढराप्रमाणें पाळण्याची वृत्ति बहुजन-समाजांत जोंपर्यंत होती, तोंपर्यंत या आचार-धर्मांची अंमलबजावणी ठीक झाली. परंतु ही परिस्थिति सदैव तशीच कायम राहणें शक्य नव्हतें हें उघड होय. काळ बदलला, कल्पना बदलल्या, शिक्षण वाढलें, लोकांच्या अंगीं चवकसपणा अधिकाधिक आला, तसतसा शास्त्रकारांनीं घालून दिलेल्या आचार-धर्मांचा कृत्रिमपणा लोकांच्या ध्यानीं येऊं लागला. विचारवंत पंडित तर स्पष्टच म्हणूं लागले, कीं परंपरागत धर्म व नीतिशास्त्र चुकीच्या मानसशास्त्रावर आधारलेलीं आहेत, या जुन्या धर्मानें व नीतीनें मानवजातीचें कल्याण होणें शक्य नाहीं, माणसाला स्वतःच्या कल्याणाची खरी इच्छा असेल तर त्यानें स्वतःचा स्वभाव आधीं नीट समजून घेतला पाहिजे, आणि तो त्यास समजून घ्यावयाचा असेल तर देहप्रवृत्तीबद्दल व देह-व्यापारांबद्दल जी तुच्छतेची भावना निर्माण होऊन बसली आहे, ती त्यानें आधीं सोडली पाहिजे.

परंपरागत आचार-धर्मामुळें इतके घोंटाळे उत्पन्न झाले आणि नीतिनियमांविरुद्ध प्रच्छन्नपणें व उघडपणें इतक्या लोकांनीं बंड केलेलें दिसून येऊं लागलें, कीं त्या नीतीच्या व आचारधर्माच्या बुडाशीं कोणती तरी मूलभूत चूक असली पाहिजे, असें विद्वानांना उत्त-रोत्तर अधिकाधिक वाटूं लागलें. आणि ती चूक कोणती असावी या-बद्दल शोध करतां त्यांची खात्री झाली, कीं जुन्या शास्त्रकारांनीं मानस-शास्त्राचा विचार एकतर्फी केला होता, मानवी देहधर्माकडे त्यांनीं पूर्ण दुर्लक्ष केलें होतें, त्या देहधर्माचा विध्वंस करतां येतो व केला पाहिजे अशी भलतीच समजूत त्यांनीं ग्राह्य मानली होती!

भलतीच नव्हे तर काय? देहधर्म म्हटला, कीं त्याचा समूळ उच्छेद करून टाकणें हीच त्याची योग्यता हेंही खरें नाहीं, आणि देहधर्माचा समूळ उच्छेद करतां येतो हेंही खरें नाहीं. आहार, निद्रा, भय, मैथुन यांत तत्त्वतः अश्लील अगर उच्छेद्य कांहींच नाहीं. त्यांचा अतिरेक

घातुक असेल, पण त्यावरून ते देहधर्म मूलतःच घातुक आहेत असें मुळींच सिद्ध होत नाहीं. देहधर्मास परिमित व व्यवस्थित रीतीनें वाव दिल्यानें जी मनःशांति आणि समाधानाची भूमिका प्राप्त होते ती एरवीं शक्य नाहीं. देहधर्मांचा कोंडमारा केल्यानें दोन तोटे होतात. एक तर त्यांतून निर्माण होणारी मनःशुद्धि खोटी, तकलुफी असते, व तिला धक्का लागून ती केव्हां नष्ट होईल त्याचा नियम नसतो; आणि शिवाय, देहधर्म आपण समूळ उपटून काढीत आहोंत अशा भ्रमांत आपण एकीकडे असतों, तर दुसरीकडे त्या दाबलेल्या देहधर्माला, दाबलेल्या स्प्रिंगला यावा तसा, आणखी पीळ येत असतो, आणि त्याची अखेरची उसळी भयंकर स्वरूपाची होण्याचा संभव वाढत असतो.

डोळयांची पाहण्याची क्रिया, अगर जिभेची खाण्याची व बोलण्याची क्रिया उगीचच्या उगीच निषिद्ध ठरविण्यांत कांहींच मर्म नाहीं, व अशा स्वरूपाची नीति कधींच उपकारक व्हायची नाहीं! रस्त्यानें जाणाऱ्या सुंदर स्त्रीकडे डोळयांची नजर गेली तर बिघडलें कोठें? त्यांत बिघडलें, अशी शास्त्रकारांनीं ओरड केली तर नंतर मात्र त्या नजरेंत दोष उत्पन्न होण्याचा संभव असतो. कारण ज्या अर्थी परस्त्रीकडे पाहणें हें पाप होय असें शास्त्रकार सांगतात, त्या अर्थी तिच्याकडे पाहण्यांत कांहीं तरी विशेष सुख असलें पाहिजे असें माणसाला वाटूं लागतें, आणि मग मात्र परस्त्रीकडे कटाक्ष टाकतांना त्याच्या मनांत विषय-वासना जागृत होते. खरें पाहतां निसर्गानें माणसाला डोळे दिले आहेत ते पहावयासाठींच दिले आहेत. अथांग समुद्र, उत्तुंग पर्वत-शिखरें, विस्तीर्ण तृणाच्छादित मैदानें, व काळयाभोर पाण्यानें तुडुंब भरलेलीं सरोवरें हीं पाहण्यात जसें वावगें कांहींच नाहीं, तद्वतच मानवी सौंदर्य पाहण्यांतही कांहीं नाहीं. "पाहूं नको" असा निषेध केल्यानें मात्र त्या पाहण्यांतली मुग्धता नष्ट होते, व पाप-वासनेखेरीज परस्त्रीकडे पाहतां येत नाहीं अशी भावना दृढ होत जाते. सारांश, भित्यापाठीं ब्रह्मराक्षस लागावा त्याप्रमाणें साध्यासुध्या देहधर्मांस व देहव्यापारांसही नसतें घातक स्वरूप प्राप्त होतें, व मग अशा देहधर्मांचें नियमन करतां करतां माणसाचा जीव कासावीस होतो.

पुन्हा, देहधर्मांचें नियमन आपल्याला वाटतें तसें शक्य नाहीं हें निराळेंच! देहधर्मांचें नियमन करणें इष्ट आहे, व साध्यही आहे. परंतु "नियमन" या शब्दाचा खरा अर्थच असा, कीं योग्य प्रमाणांत त्यांची तृप्ति करून त्या प्रमाणापलीकडे मात्र त्यांच्या मागणीचा अव्हेर करणें. लहान मुलांना शिस्त लावायची, याचा अर्थ त्यांच्या साऱ्या उच्छृंखलपणाचा नायनाट करावयाचा, असा का आपण करतों? त्यांच्या ठिकाणच्या स्वैरवृत्तीची कांहीं एका प्रमाणांत तृप्ति करायची, व त्याव्यतिरिक्त मात्र त्या वृत्तीस वाव द्यायचा नाहीं, अशीच "शिस्त" या शब्दाची खरी व्याख्या आपण समजतों ना? देहधर्मांसही हाच न्याय लागू आहे. तारतम्यभाव न ठेवतां देहधर्मांचा उच्छेद आपण करूं लागलों, तर त्याचा अगदींच विपरीत परिणाम झाल्यावांचून रहात नाहीं. एखाद्या माणसानें आपल्या घराचें पुढचें आंगण लोकांना स्वच्छ दिसावें म्हणून येथील कांटे–कुटे, शेण माती भराभर उचलून ती मागच्या आंगणांत टाकण्याचा सपाटा चालविला तर काय होईल? त्या घाणीचा भला मोठा ढीग त्याच्या मागील दारीं सांठत जाईल, व अखेर एक दिवस असा येईल, कीं त्याची दुर्गंधी साऱ्या घरांत पसरून असह्य होईल, आणि स्वच्छतेबद्दल त्याने मिळविलेला लौकिक खोटा ठरेल! देहधर्मांची गोष्ट अशीच आहे.

म्हणून आपल्याला जर मानसशास्त्र बनवायचें असेल, व कृत्रिम नव्हे तर खऱ्याखुऱ्या व सचोटीच्या मानसशास्त्रावर आचारधर्म आणि नीति यांची उभारणी करून वैयक्तिक व सामाजिक जीवनाला नवें वळण द्यायचें असेल, तर अगदीं पहिला सिद्धांत आपण मांडला पाहिजे तो हा, कीं माणसाचे देहधर्म तुच्छ अगर तिरस्करणीय नसून महत्वाचे व अभ्यसनीय होत.

तसाच विचार केला, तर देहधर्मांस स्वतंत्र अस्तित्व नसून केवळ मनःस्थितीप्रमाणें व मनोव्यापारानुसार ते घडतात, हें तरी पूर्णांशानें खरें कोठें आहे? देहधर्म व देहव्यापार जसे मनावर अवलंबून आहेत, तसेच मनोव्यापारही देहावर अवलंबून आहेत, याची सत्यता पटवायला कांहीं फारसा वेळ लागणार नाहीं.

माणसाची प्रकृति निकोप व सुदृढ असली कीं, त्याचें मनही निकोप व सुदृढ असतें हा न्याय अगदीं सर्वमान्य आहे. सारे देहव्यापार उत्तम प्रकारें चालूं असले आणि आरोग्यानें देह मुसमुसत असला, कीं माणसाच्या मनांतील विचार उच्च असतात, भावना उदार असतात व संकल्पही तेजस्वी असतात. हातपाय धट्टेकट्टे असले, कीं मोठमोठ्या साहसांचे विचार मनुष्याला सुचतात. बळकट, धिप्पाड शरिराच्या माणसाचें मन बेडर असतें, आणि अंतःकरण दिलदार असतें, त्याच्या मनाला भयाची बाधा होत नाहीं, यशाविषयीं त्याला शंका वाटत नाहीं, अडथळे दिसत नाहींत, आणि यशाऐवजीं अपयश सोसावें लागलें तरी त्याखालीं त्याची ईर्षा दबली जात नाहीं! मित्रांवर तर तो प्रेमाचा वर्षाव करीतच असतो, पण शत्रूंसही क्षमा करण्याची त्याची तयारी असते. उलट, ज्याचा देह सदा व्याधींनीं गांजलेला आहे अशा माणसाचें मनही सदा विटलेलें, आंबलेलें, चिडलेलें असतें. त्याचे विचार क्षुद्र असतात, भावना विकृत असतात, आणि संकल्प दुबळे असतात! आणि दोन वेगवेगळ्या व्यक्तींच्या बाबतींत मनोव्यापारांची ही भिन्नता आढळून येते येवढेंच नव्हे, तर एकाच व्यक्तीच्या मनोव्यापारांतही देहाच्या स्वास्थ्या-बरोबर आणि अस्वास्थ्याबरोबर बदल होतो, असा सामान्य अनुभव आहे.

आपली तब्येत अगदीं उत्कृष्ट असते त्या वेळीं आपल्या मनांत कोणकोणते विचार व संकल्प येतात व कांहीं कारणानें दुसऱ्याच दिवशीं आपली तब्येत बिघडली कीं ते सारे विचार व संकल्प कसकसे बदलतात तें पाहण्यासारखें आहे. इतकेंच नव्हे तर आदल्या रात्रीं भरपूर झोंप मिळाली असल्यास आपल्या मनाचें जें आनंदी, उल्हसित आणि ईर्षा-युक्त स्वरूप प्रगट होतांना दिसतें, तें जाग्रणानंतर दुसऱ्या दिवशीं चुर-चुरणारे डोळे चोळीत उठल्यास दिसत नाहीं. कोणींरें विनोदानें म्हटलें आहे तें विनोदापुरतेंच नव्हे तर अक्षरशः खरें आहे, कीं आपला दिवस कसा जाईल हें त्या दिवशीं घडणाऱ्या गोष्टींपेक्षां आदल्या रात्रीं आप-ल्याला झोंप किती मिळाली होती यावरच अधिक अवलंबून असतें.

चमचमीत मेजवानी झोडून धूम्रपान करीत मित्रांशीं बोलणाऱ्या माणसाचें मनही प्रफुल्ल असतें. त्या क्षणीं त्याच्या मनाला या संसारांत

कांहीं उणेपणा दिसत नाहीं. या जगांत सगळें कांहीं माणसाच्या इच्छे-प्रमाणें घडतें असें त्या क्षणीं त्याला वाटतें. यंव करूं, त्यंव करूं, आपल्याला काय कमी आहे, असें तो बडबडतो. ईश्वराची आठवण अशा वेळीं सहसा होत नाहीं, पण ती झालीच तर ईश्वर मोठा न्यायी, आणि चतुर आहे अशी ईश्वराची तारीफ त्या माणसाकडून होते.

पण त्याच माणसाला दैवदुर्विलासानें एके दिवशीं उपाशी तडफडण्याची वेळ आली तर? मग मात्र त्याच्या मनांतला सारा अहंकार लुप्त होईल, जगांत एकही गोष्ट माणसाच्या इच्छेप्रमाणें घडत नाहीं असें तो तळतळून सांगेल, ईश्वराच्या घरीं न्याय नाहीं असें म्हणून तो ईश्वराला शिव्या-शाप द्यायलाही कमी करणार नाहीं.

म्हणजे माणसाच्या मनांतल्या विचारांचें व संकल्पांचें स्वरूप त्याचें पोट भरलेलें आहे कीं रिकामें आहे यावरच अधिक अवलंबून आहे असें नाहीं कां? माणसाचे प्रातर्विधि उत्तम प्रकारें झालेले असले, त्याची जीभ स्वच्छ असली, आणि भूक योग्य प्रकारें शमलेली असली कीं त्याच्या मनोव्यापारांचें स्वरूप ओजस्वी असतें; आणि तसें नसलें तर त्या मनोव्यापारांवरही बुरसा आलेला असतो. एखाद्या माणसाच्या मनांत कोणत्या प्रकारचे विचार चालू आहेत हें ठोकळ मानानें ओळखायचें झाल्यास डॉक्टर पाहतो तशी त्याची जीभ पहावी, असें म्हणायला कांहीं हरकत नाहीं. तोंडाला चव असण्यावर अगर नसण्यावर आपली मनस्थिति खरोखरच बहुतांशीं अवलंबून आहे! मदिरापानाचा अतिरेक करणारीं माणसें दिवसां जी मनोवृत्ति दाखवितात ती रात्रीं निशा केल्यानंतरच्या त्यांच्या मनोवृत्तीहून बहुतेक भिन्न असते, यावरूनही हेंच सिद्ध होतें, कीं शरिराच्या सावधपणावरच मनाचा सावधपणा अवलंबून आहे.

या बाबतींत आणखी एक गमतीचा पुरावा दाखल करण्यासारखा आहे. सामान्यतः आपण असें समजतों, कीं आपल्या मनांत भय, राग अगर शोक अशी एखादी भावना प्रबळ झाली, कीं विविध प्रकारच्या देहव्यापारांनीं ती प्रगट होते. भय वाटलें कीं आपण किंकाळी फोडतों,

छातीवर हात ठेवतों, व आपल्या सर्वांगाला कंप सुटतो. राग आला कीं आपण डोळे वटारतों, मुठी वळतों आणि पाय आपटतों. शोक झाल्यास आपण मोठमोठ्यानें हुंदके देऊन रडतों, गुडघ्यांत मान घालतों किंवा ऊर बडवून घेतों. या देह-व्यापारांस त्या त्या भावनेचा आविष्कार म्हणतां घेईल. वाटल्यास त्यांस आपण त्या त्या भावनेचा 'अभिनय' म्हणूं. भावना उद्भवली, कीं हा अभिनय घडतो असें आपण मानतों. म्हणजे मनोव्यापारांवर देहव्यापार अवलंबून आहेतसें आपण समजतों. परंतु एक प्रश्न विचारण्यासारखा असून आपण कधीं विचारीत नाहीं, तो असा कीं, अभिनयावर भावना अवलंबून आहे कीं नाहीं? मन शोकाकुल झालें कीं हुंदके येतात हें तर खरेंच. पण मुद्दामच ओक्साबोक्शीं रडण्याचा अभिनय केला तर मनांत शोक-विचार उद्भवेल कीं नाहीं? भय वाटलें, कीं आपण किंचाळतों. पण किंकाळी फोडली तर मनांत भय येईल कीं नाहीं?

या प्रश्नाचा विचार करतांना एक गोष्ट तर उघडच दिसते. नसलेली भावना अभिनयानें उद्भवेल कीं नाहीं हा प्रश्न अलाहिदा, पण असलेली भावना त्या अभिनयामुळें बलवत्तर होते यांत शंकाच नाहीं. शोक करणारें माणूस गळे काढून रडूं लागलें कीं त्या शोकाला आणखीच भरती येते. रागावलेल्या माणसानें आदळआपट सुरू केली, कीं त्याच्या रागाचा पारा आणखीच चढतो. आणि शिवाय, अभिनयानें भावना अधिक प्रबल होते हें जसें निःसंशय, तसेंच आपण तो अभिनय बंद केला तर भावना हतबल होऊन अखेर विराम पावते यांतही संशय नाहीं. भ्यालेला माणूस पळ काढण्याऐवजीं जागच्या जागीं उभा राहिला तर त्याचें भय दुसऱ्याच क्षणीं नष्ट होईल. शोकविद्ध झालेल्या माणसानें अश्रु आंवरले व हुंदके बंद केले तर शोक फार वेळ राहणार नाहीं. आणि रागानें भडकलेल्या माणसानें हातापायांची आदळआपट केली नाहीं व तोंडांतून ब्र काढला नाहीं तर त्याचा राग अल्प काळांतच शमेल. "राग आला कीं दहा अंक मोजा" या म्हणींतलें मर्म हेंच आहे. देहव्यापारांच्या रूपानें होणारा अभिनयच थांबविला तर ते ते मनोव्यापार खुंटतात! देहव्यापारांवर ते अवलंबूनच आहेत!

खेरीज, अभिनयाच्या अभावीं भावना ओसरते येवढेंच नव्हे तर अभिनयाच्या जोरावर मूळ अंतःकरणांत नसलेली भावना उत्पन्न करतां येते असें म्हणावयासदेखील आधार आहे. रंगभूमीवर उत्कट भावना वर्तविण्याऱ्या नटनटींची साक्ष या बाबतींत फार उपयुक्त होईल असें वाटल्यावरून वुइल्यम जेम्स या मानसशास्त्रज्ञानें अनेक नटनटींचीं मतें मागविलीं. तेव्हां बहुतेकाचें उत्तर असेंच आलें कीं, रडण्याचा अभिनय जसजसा मनःपूर्वक करावा तसतशी शोकाची भावना हृदयांत खरोखरीच उचंबळून येते, आणि इतर भावनाहि याप्रमाणें अभिनयाच्या जोरावर स्वतःच्या मनांत तात्पुरत्या निर्माण करणें शक्य आहे.

सारांश, देहधर्म व देहव्यापार यांवर मनोधर्म आणि मनोव्यापार अवलंबून आहेत यांत संदेह नाहीं. कांहीं मानसशास्त्रकारांनीं या सिद्धांतास फारच महत्त्व दिलें असून मनोधर्माविषयींचे सारे प्रश्न देह-धर्माच्या परिभाषेनें सोडविण्यापर्यंत त्यांनीं मजल मारली आहे. त्यांच्या मतें देहाव्यतिरिक्त मनाचें म्हणून स्वतंत्र असें कांहीं स्वरूप नाहींच; व त्यामुळें अर्थातच मानसशास्त्र व शारीरशास्त्र यांत फारसा भेद मान-ण्याचेंहि प्रयोजन नाहीं.

या अतिशयोक्तीशीं आपल्याला काहीं कर्तव्य नाहीं. देहधर्मास तुच्छ लेखणारे जसे कांहीं लोक झाले, तसेच देहधर्माचें स्तोम माजवून मानवी मनाचें अस्तित्वच नाकबूल करणारेहि काहीं झाले, एवढेंच फार तर मानसशास्त्राच्या इतिहासांतील एक गंमत म्हणून आपण लक्षांत ठेवायचें. आपल्या दृष्टीनें महत्त्वाचा मुद्दा एवढाच समजायचा, कीं केवळ 'चिद्वाद' किंवा केवळ 'देहवाद' दोन्हीहि चुकीचे आहेत. खरी गोष्ट ही, कीं आपल्या प्रत्येकाच्या जीवनांत आपापल्या मनाची व देहाची–आपल्या चित्तत्वाची आणि जडतत्वाची– क्रिया सारखी चालू आहे. आपण शुद्ध चित्स्वरूपी आहोंत हाही सिद्धांत उदात्त असला तरी व्यवहार्य नाहीं; आणि आपण केवळ जडदेहस्वरूपी आहोंत असें मानण्यातहि शहाणपणा नाहीं. मानसशास्त्राची जी चर्चा करण्याचें मी योजिलें आहे तिचा परमार्थाशीं संबंध नाहीं. वैयक्तिक व सामाजिक जीवन आंनदमय

करण्यासाठीं मानसशास्त्रांतील कोणत्या सिद्धांतांचा उमज सामान्य स्त्रीपुरुषांस प्राप्त करून दिला पाहिजे, एवढेंच पाहण्याचा माझा हेतु आहे. म्हणून, मी म्हणतों कीं, स्वतःला आपल्या देहाशीं तद्रूप मानण्याचा वेडेपणा जसा कोणी करूं नये, त्याचप्रमाणें देहापासून सर्वस्वीं भिन्न व अलिप्त अशा " आत्मारामाशींही " स्वतःस तद्रूप समजण्याचा असमंजस हट्ट कोणी करूं नये. हें सारें विश्व चित् आणि जड अशा द्वंद्वानें साधलेलें आहे. या दोहोंतील अंतिम तत्त्व कोणतें तें शोधतां शोधतां मोठमोठे पंडित व्यर्थ शिणले आहेत. तो शीण आपल्याला काय करायचा आहे ? जिकडे तिकडे चित्–जडाचा अखंड अन्वय भरलेला आहे असेंच आपण मानूं. चित्त म्हटलें कीं तें देहान्वित असणारच, आणि देहधर्म म्हटला कीं तो चिदन्वित असणारच, अशीच समजूत आपण आपल्या मनाशीं ठेवूं.

विसाव्या शतकांतलें नव–मानसशास्त्र या समजुतीवरच आधारलेलें आहे. आज प्रचलित असलेले मानसव्यापारविषयक विविध सिद्धांत ज्याला नीट समजून घ्यायचे असतील त्यानें " चित्–देहान्वया " ची ही आधुनिक कल्पना नीट ध्यानांत वागविली पाहिजे. म्हणूनच या प्रकरणांत तिची विस्तारानें फोड करणें भाग पडलें. आतां पुढील प्रकरणांत मुख्य विषय हातीं घेऊन पाऊल पुढें टाकावयास हरकत नाहीं.



# प्रकरण ४ थें

मानसशास्त्र बनवावयाचें याचा अर्थ उघडच असा, कीं आपण ज्याला माणसाचें 'मन' म्हणतों, त्या मनांत कोणकोणत्या शक्तींचा अंतर्भाव होतो, त्या शक्ती केव्हां व कां प्रगट होतात, त्यांचा आपल्या हितासाठीं अगर अहितासाठीं कसा उपयोग करतां येईल, त्या शक्तींत उच्च–नीच असा कांहीं भेद मानतां येईल किंवा नाहीं, इत्यादि प्रश्नाचा निर्णय करावयाचा. अशा निर्णयाच्या हेतूने आपण मानवी मनाचा विचार करूं लागलों, कीं दोन गोष्टी ठळकपणें आपल्या दृष्टीसमोर उभ्या राहतात. (१) पहिली गोष्ट ही, कीं मनुष्यप्राणी हा उत्कर्ष-तत्त्वानुसार खालच्या कोटीकोटींतून वरवर चढत आजच्या महत्पदावर आरूढ झालेला आहे. अर्थात् या विकासाचा त्याच्या देहाशीं व त्यामुळें त्याच्या मनाशींही संबंध असलाच पाहिजे. (२) आणि दुसरें असें कीं, मानवी मन अनेक अवस्थांतरांतून उत्कर्ष पावत पावत आजच्या कोटीस चढलें असलें पाहिजे. मानवी संस्कृतीच्या शतकानुशतकांच्या इतिहासात मुख्यत्वें-करून जर कोणती गोष्ट अपरिपक्व होती ती परिपक्व होत गेली असली तर ती म्हणजे मानवी मनच होय.

या दोन्ही प्रश्नांचा विचार केल्याखेरीज मानवी मनाच्या अवस्थांचें व व्यापारांचें जें ज्ञान करून घेण्याची आपली इच्छा आहे तें आपणांस मिळवितां येणार नाहीं. म्हणून या प्रकरणांत मुख्यतः हे दोन प्रश्न चर्चेस घेण्याचें मीं योजिलें आहे.

आपल्याला पहिला विचार करावयाचा तो हा, कीं ज्या मनुष्याच्या मनाचा अभ्यास आपणांस करावयाचा आहे तो 'मनुष्य' कांहीं अंतराळांतून पृथ्वीवर पडला नाहीं. सृष्टीच्या प्रचंड उत्कर्ष-क्रियेंत जड-कोटी, वनस्पतिकोटी, पशुकोटी, या जशा एकीच्या पोटांतून दुसरी अशा क्रमानें उद्भवल्या त्याचप्रमाणें मनुष्यकोटीचाही पशुकोटींतून जन्म झाला. हा जन्म केव्हां झाला, हें अजून कोणाला नक्की सांगतां आलें नाहीं.

परंतु तो जन्म होऊन कित्येक युगेंच्या युगें लोटलीं आहेत याबद्दल मात्र कोणासही संशय नाहीं. मनुष्य प्रथम माशासारखा होता कीं बेडकासारखा होता, माशासारखा असला तर देवमाशासारखा होता कीं दैत्य माशासारखा होता, याबद्दल वादाला जागा असेल; परंतु माणूस प्रथम निकृष्ट कोटींतल्या प्राण्याच्या स्वरूपाचा होता याबद्दल दुमत नाहीं; आणि त्याचप्रमाणें मानवी कोटीचा पृथ्वीतलावर प्रथम अवतार झाला तेव्हांपासून आजपर्यंतच्या सहस्रावधि वर्षांच्या काळांत मानवी जीविताचें स्वरूप हळुहळू बदलत गेलें आहे हेंदेखील निःसंशय आहे.

मानवी जीविताचा हा इतिहास जर खरा असेल तर अर्थातच हेंहि खरें असणार, कीं तें जीवित, आणि ज्या निकृष्ट कोटींतून मनुष्य उत्क्रांत झाला त्यांचें जीवित, यांत बरेंच साम्य असलें पाहिजे, व मानसशास्त्राच्या अभ्यासकांनीं त्या साम्याकडे दुर्लक्ष करतां कामा नये.

उदाहरणार्थ असें पहा, कीं मनुष्य प्राण्याच्या ठिकाणीं विविध अंतःप्रवृत्ती आहेत असें आपण मानतों. भीति वाटणें, कोपयुक्त होणें, रक्षण करणें, हल्ला चढविणें, धांवणें अगर एकेच ठिकाणीं उभें राहणें, खाणेंपिणें अगर उपाशी राहणें, न्हाणें, निजणें, अशा किती तरी अंतःप्रवृत्ती प्रत्येक मनुष्याच्या अनुभवास येतात. या अंतःप्रवृत्तींचें वैशिष्ट्य आपण असें समजतों, कीं त्या प्रवृत्तींत तर्काचा अगर शांत विचाराचा भाग नसतो. आकाशांत वीज एकदम चमकावी त्याप्रमाणें या प्रवृत्ती एकदम आणि क्षणमात्रच उसळतात व मग तदनुसार आपल्या देहाचे व्यापार घडतात. पण ज्या या अंतःप्रवृत्तींस 'मानवी' अंतःप्रवृत्ति असें नांव आपण देतों, त्या खरोखरच 'मानवी' आहेत काय? म्हणजे त्या फक्त मनुष्याच्याच ठिकाणीं आहेत असें म्हणतां येईल काय? पशुपक्ष्यांच्या ठिकाणीं त्या आढळून येत नाहींत काय? पशुपक्षी खात पीत नाहींत? न्हात अगर निजत नाहींत? भीत अगर रागावत नाहींत? आपल्या पिलांचें जतन करून परक्यावर हल्ला करीत नाहींत? पशुपक्षी या सर्व गोष्टी करतात. याचाच अर्थ असा, कीं

मानवी अंतःप्रवृत्तींपैकीं बहुतेक सगळ्या 'पाशवी' प्रवृत्तीच आहेत. त्यांतूनच त्या उद्भवल्या आहेत. पाशवी देह नीटनेटका करून मनुष्यानें स्वतःसाठीं खास मानवदेह निर्माण केला खरा; परंतु हीन-कुलोत्पन्न माणसानें अभिजात वागणुकीची कितीही ऐट आणली तरी केव्हां तरी त्याच्या बोलण्या चालण्यांत त्याचें मूळचें हीनत्व उघडें व्हावें, तद्वतच मानवी देहाचें आहे. वाघ्याचा येळकोट कधीं जात नाहीं. तसेंच मानवी देहाचें उगमस्थान कधीं झांकलें जायचें नाहीं. तें झांकण्याचा प्रयत्न केल्यास आपले मानसशास्त्रीय सिद्धांत मात्र भलत्या मार्गाला वाहवतील.

म्हणून मानवी अंतःप्रवृत्तींस 'देहप्रवृत्ती' असेंच नांव दिल्यास अधिक बरें होईल असें मला वाटतें. खाणें, पिणें, स्वच्छतेसाठीं स्नान करणें, सुरक्षिततेसाठीं लपणें अगर चढाई करून जाणें, या साऱ्या मूलतः देहाच्याच प्रवृत्ती होत. प्रत्येक मनुष्याच्या हृदयांत गूढ स्वरूपाची, आधिदैविक प्रेरक शक्ति आहे, असा सामान्य समज आहे. इंग्रजीत या शक्तीस Intuition असें नांव आहे. मराठींत 'अंतःप्रेरणा' असें नाव तिला देतां येईल. ह्या गूढ शक्तीच्या सहाय्यानें आपण वारंवार हे अगर ते निश्चय करतों, किंवा करण्याचें लांबणीवर टाकतों, अमुक एक कार्य हातीं घेतों किंवा तें हातीं घेतां कामा नये असें ठरवितों. ही अंतःप्रेरणा देहप्रवृत्तींच्या सदराखालीं येईल असें माझें म्हणणें नाहीं. परंतु, ती वगळल्यास बाकीच्या ज्या सामान्य प्रवृत्ती शिल्लक राहातात, व ज्यांच्यावरच मानवी जीवितांतील सामान्य व्यवहार बहुतांशीं अवलंबून असतात, त्यांस देहप्रवृत्तीच मानणें अधिक बरोबर होईल यांत संशय नाही.

किंबहुना 'अंतःप्रवृत्ति' या शब्दाचा अर्थ आपण असाच समजूं, कीं जी शारीरिक अगर मानसिक शक्ति त्या त्या विशिष्ट प्राण्याच्या ठिकाणीं असेल तिचें क्षणिक स्फुरण. कनिष्ठ कोटींतील प्राण्यांच्या ठिकाणीं मानसिक शक्तींचा विकासच नव्हे तर उदयदेखील नीटसा झालेला नसतो. त्यामुळें त्यांच्या सर्व प्रवृत्ती शारीरिक असतात. वरिष्ठ कोटींतील प्राण्यांच्या मानसिक शक्तींचा विकास जरी फारसा झालेला

नसला तरी त्यांचें अस्तित्व मात्र निःसंशय असतें, आणि अखेर मानवी प्राण्याच्या ठिकाणीं विविध शारीरिक शक्तींप्रमाणेंच विविध मानसिक शक्तींचें कार्य मान्य करणें अवश्य होतें. याचा अर्थ असा, कीं मानवी जीवनक्रमांत दोन भिन्न प्रकारच्या शक्ती कार्य करीत असतात. मनुष्य-प्राणी कित्येक गोष्टी आपल्या मानसिक शक्ती उपयोगात आणून साधीत असतो, आणि इतर कित्येक गोष्टी आपल्या शारीरिक शक्तींच्या बळावर घडवून आणीत असतो.

मात्र, हें विसरतां कामा नये कीं मानवी जीविताचा बहुतेक भाग असा असतो, कीं त्यांत त्याच्या मानसिक शक्तीपेक्षां त्याच्या देह-धर्मांचाच संबंध अधिक असतो. म्हणून मानवी चरित्रासंबंधीं बोलतांना 'अंतःप्रवृत्ति' या एकाच सदराखालीं मानसिक व शारीरिक अशा दोन्ही प्रकारांचा समावेश केला पाहिजे हें जरी खरें, तरी या दोहोंपैकीं अधिक वारंवार कार्य करणाऱ्या प्रवृत्ती कोणत्या, असें कोणीं विचार-ल्यास माणसाच्या देहप्रवृत्ती असेंच उत्तर द्यावें लागेल. मनुष्याचे शेंकडा नव्याण्णव व्यवहार असे असतात, कीं त्यांत तर्काचा अगर विचारांचा संबंध क्वचितच असतो. सुंदर फूल दिसलें कीं तोडणें, पिक-लेलें फळ पुढें आलें तर खाणें, सुगंध आला तर त्या दिशेनें चालत जाणें, अशाच स्वरूपाच्या व्यवहारानें मानवी जातीची घडण बहुतांशीं होत असते; आणि असले व्यवहार देहप्रवृत्तींच्या स्फुरणामुळेंच घडून येतात हेंहि उघडच आहे. म्हणूनच मी वर एकदां म्हटलें, कीं मानस–शास्त्राच्या अभ्यासकानें मनुष्याच्या देहप्रवृत्तींचें महत्व योग्य प्रकारें ओळखलें पाहिजे. एखाद्या मनुष्यास वडिलोपार्जित घरदार मिळावें, व मग तें राजवाड्यासारखें असो अगर चंद्रमौळी असो, जसें असेल तसें खपवून घेणेंच त्याच्या हिताचें ठरावें, तसेंच मनुष्य व त्याचा मानवी देह यांचें आहे. निसर्गाकडून त्या देहाचा वारसा त्याला मिळालेला आहे. त्या देहाचे जे कांहीं बरे वाईट गुणधर्म आहेत ते निसर्गसिद्ध आहेत. त्या देहधर्मांबद्दल शोक करण्याचा अगर त्यांची अमर्याद निंदा करण्याचा वेदांत व्यर्थ होय. आजच्या नव्या युगांत तरी या वेदांताचा फोलपणा आपण ध्यानीं घेतला पाहिजे. आणि मानस–शास्त्र

गयाशुद्ध व्हावें अशी आपली इच्छा असेल, तर आपण आपल्या मनाशीं अशी खूणगांठ बांधली पाहिजे, कीं माणसाला जशा विविध मानसिक प्रवृत्ती आहेत, तशाच अनेक देहप्रवृत्ती आहेत, व या अनेक देहप्रवृत्तींचा माणसाच्या जीवनावर हरघडी परिणाम होत आहे.

किंबहुना, माणसाला देहप्रवृत्ती जर अजिबात नसत्या तर त्याच्या मानसिक प्रवृत्तींचा काय उपयोग झाला असता हें समजणें कठीण आहे. ' बुद्धि ' म्हणजे मनुष्याची विशिष्ट शक्ति होय असें आपण नेहमीं म्हणतों, व या बुद्धीच्या सहाय्यानें माणूस निरनिराळ्या गोष्टींची तुलना करतो, त्यांचे गुणधर्म ठरवितो, तारतम्य करतो आणि विचारपूर्वक निश्चय करतो असें म्हणण्याचा प्रघात आहे व त्यांत पुष्कळसें तथ्यहि आहे. पण खरें पाहतां, मनुष्य विचार करतो याचा अर्थ काय ? समजा, एखाद्या मनुष्याच्या अंगावर एखादा बेफाम बैल चालून आला. अशा वेळीं त्या संकटापासून दूर पळण्याची देहप्रवृत्ति उद्‌भवेल, किंवा त्या संकटास तोंड देण्याची प्रवृत्ति उद्भवण्याचाहि तितकाच संभव आहे. म्हणजे भय व शौर्य या दोन भिन्न देहप्रवृत्तींपैकीं कोणची तरी एक, किंवा दोन्हीहि स्फुरण पावाव्यात असा हा प्रसंग आहे. किंवा उदाहरणादाखल आपण असें समजूं, कीं एखादा मनुष्य बरोबर कांहीं द्रव्य घेऊन निघाला, व एका ओसाड जागीं त्याच्यावर चार पठाणांनीं हल्ला केला. अशा प्रसंगीं स्वतःजवळ जें कांहीं आहे तें जतन करण्याची किंवा तें सोडण्याची, दोन्ही प्रकारच्या देहप्रवृत्तींचा अनुभव त्या मनुष्यास आल्यावांचून राहावयाचा नाहीं. अशा वेळीं—म्हणजे ज्या वेळीं दोन किंवा अनेक देहप्रवृत्ती एकदम उद्भवतात त्या वेळीं—मनुष्य ' विचार ' करतो. ही देह-प्रवृत्ति हितावह नाहीं, तीही नाहीं, अशी चाळणी करीत करीत शेवटीं कोणत्या तरी एका विशिष्ट देहप्रवृत्तीस मनुष्य वाव देतो. यालाच आपण म्हणतों मनुष्यानें ' विचार केला. '

वरील विवेचन वाचकांना पटलें असेल तर ते सहज मान्य करतील, कीं मनुष्य ' विचार करतो ' याचा अर्थ, तो एका किंवा अनेक देह-

प्रवृत्तींचें संयमन करून बाकी राहिलेल्या एका विशिष्ट देहप्रवृत्तीस अनुसरून वागतो इतकाच. मनुष्याच्या ठिकाणीं अत्यंत प्रगल्भ स्वरूपाचा मेंदू आहे हें तर खरेंच. परंतु त्या मेंदूचें कार्य खरें पाहतां विविध देहप्रवृत्तींनीं एकाच वेळीं केलेल्या मागण्या तोलून, पारखून, त्यांतील कोणती तरी एक निवडण्यापलीकडे फारसें नाहीं. कसें तें पहा.

मनुष्याहून कनिष्ठ कोटींतील कांहीं प्राण्यांसदेखील मेंदू आहे. परंतु तो मानवी मेंदूइतका परिणत अवस्थेस पोहोंचलेला नाहीं. मनुष्याच्या मेंदूचे ' पूर्व-मेंदू ', ' मध्य-मेंदू ' आणि ' पश्चिम-मेंदू ' असे तीन भाग मानले जातात. यांपैकीं ' पूर्व-मेंदू ' हा सर्वांत परिणत भाग होय, व तो इतक्या परिणत अवस्थेंत फक्त मनुष्याच्या ठिकाणींच आढळून येतो. हें जर खरें असेल तर असें म्हणावयास हरकत नाहीं, कीं खास मानवी बुद्धि म्हणून जी कांहीं शक्ति आहे तिचा या ' पूर्व-मेंदू 'च्या क्रियेशीं निकट संबंध असला पाहिजे. ज्या प्राण्यांस मेंदू आहे परंतु परिणत ' पूर्व-मेंदू ' नाहीं त्यांचें विवक्षित परिस्थितींत कसें वर्तन होतें, व हुबेहूब तसल्याच परिस्थितींत मनुष्य, आपल्या ' पूर्व-मेंदू 'च्या सहाय्यानें कशा प्रकारचें वर्तन करतो हें पाहिलें, व त्यांतील फरक ध्यानांत घेतला तर तो फरक म्हणजेच मानवी बुद्धीचें खास विशिष्ट कार्य होय असें म्हणतां येईल. या दिशेनें पाश्चात्य मानसशास्त्रज्ञांनीं अनेक प्रयोग करून पाहिले आहेत, व त्या सर्वांचा निष्कर्ष म्हणून आपणांस असें समजतां येईल, कीं मानवी बुद्धीची क्रिया बहुतांशीं उद्ग्राहक स्वरूपाची—म्हणजे जें पुढें येईल त्याला तारतम्याची कसोटी लावण्याची—आहे.

उदाहरणार्थ, एखाद्या कुत्र्याला भूक लागली व त्याला समोर खाद्य दिसलें तर अन्न-भक्षणाची जी देहप्रवृत्ति त्याच्या ठिकाणीं एकदम उसळेल त्या प्रवृत्तिनुसार तें जनावर ताबडतोब वागेल. मनुष्य मात्र तसा वागेलच असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. कारण, त्या उसळणाऱ्या देहप्रवृत्तीची तारतम्यानें योग्यता ठरविण्याची शक्ति त्याच्या ठिकाणीं आहे. ही शक्ति म्हणजेच मानवी ' बुद्धि ' होय. लहान मुलांची बुद्धि अपरिपक्व असते असें आपण म्हणतों. त्याचा अर्थ असाच

नव्हे का, कीं त्यांच्या अंगीं तारतम्याची शक्ति कमी असते? लहानें मुलें जें जें चांगलें दिसेल तें तें हवें म्हणतात. तें त्यांना पाहिजेसें वाटतें व कोणतीही देहप्रवृत्ति उद्‌भवली कीं ती दाबण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नसतें. बालकाची मुग्धवृत्ति म्हणून ज्या वृत्तीचा आपण काव्यांत गौरव करतों ती खरें पाहतां तारतम्यशक्तीचा अभावच होय. मनुष्य वयानें व ज्ञानानें जसजसा वाढतो,— म्हणजे त्याचा ’पूर्वमेंदू’ जसजसा अधिकाधिक कार्यक्षम होत जातो—तसतशी त्याच्या ठिकाणची तारतम्यशक्ति अधिक उन्नत आणि कार्यक्षम होत जाते हेंच खरें. साधा भोळा मनुष्य, आणि धूर्त विचारी मनुष्य या दोघांतील महत्त्वाचा फरक हाच, कीं एकाच्या ठिकाणीं तारतम्य फार कमी असतें आणि दुसऱ्याच्या ठिकाणीं तें फार वाढलेलें असतें. आणि याच न्यायानें लौकिक दृष्टीनें ज्याला शहाणा म्हणतां येईल तो शहाणा मनुष्य, आणि शास्त्रीय दृष्टीनें ज्याला शहाणा म्हणतां येईल तो शास्त्रज्ञ, या दोघांतील खरें अंतर हेंच, कीं साध्या शहाण्याला जें तारतम्य नसतें तें शास्त्रज्ञाला असतें.

सारांश, ज्याला आपण ’मन’ ’मन’ म्हणून म्हणतों त्याचें कार्य स्थूल मानानें पहातां देहप्रवृत्तींची तुलना आणि निवड करणें हेंच ठरतें. इतर प्राण्यांस नसलेल्या मनःशक्ती मनुष्यास आहेत यांत संशयच नाहीं. मनुष्याच्या ठिकाणीं ’तर्क’ आहे, ’कल्पकता’ आहे, ’स्मृति’ आहे, अशा विविध मानसिक शक्ती आहेत. इतर प्राण्यांस जें प्राप्त व सन्निध आहे तेवढेंच दिसतें. पंचेंद्रियांस ज्या पदार्थांच्या संवेदना प्रत्यक्ष होत असतील तेवढेच पदार्थ त्यांस त्या त्या क्षणीं समजतात. त्या क्षणापुरतें तेवढ्या पदार्थांनेंच त्यांचे ’जग’ बनलेलें असतें. मनुष्याचें तसें नाहीं. जें प्राप्त व संन्निध आहे तें तर त्याला कळतेंच, पण शिवाय जें दूर व अप्राप्य आहे तेंही त्याला कळतें, आणि जें पूर्वीच मिळालें अथवा मिळालें व पुनः सांडलें त्याचीही त्याला स्मृति असते. जें होऊन गेलें त्याची ’स्मृति’, जें होत आहे त्याची ’जाणीव,’ आणि जें भविष्यकालीं होणें शक्य आहे त्याची ’कल्पना’ अशा तीन भिन्न प्रकारच्या मानसिक शक्तींचा मनुष्याच्या आयुष्यावर प्रतिक्षणीं परिणाम

होत असतो. किंवा वाटल्यास असें म्हणूं, कीं मानवी मनाचें स्वरूप मुख्यत: त्रिविध आहे. त्या मनाला आठवण राहाते, त्याला जें समोर असेल त्याचें ज्ञान असतें, आणि जें पुढें घडावयाचें असतें त्याचीही कल्पना करतां येते. या त्रिविध मनोव्यापारांची संपूर्ण चर्चा आपल्याला यथावकाश करावयाचीच आहे. सध्यां वाचकांच्या मनावर जो मुद्दा विशेष रीतीनें ठसवावा अशी माझी इच्छा आहे तो येवढाच, कीं ज्या अर्थी उत्कर्षतत्त्वानुसार मनुष्यप्राणी पशुकोटींतूनच हलकें हलकें उद्भवलेला आहे, त्या अर्थी त्याच्या ठिकाणच्या बहुतेक प्रवृत्ती देह-प्रवृत्तीच होत हें उघड आहे व खास मनाच्या म्हणून ज्या कांहीं शक्तींचा विलास मानवी जीवितांत दिसून येतो त्यांचादेखील आपल्याला सामान्यपणें कल्पनाही नसते इतका त्याच्या ठिकाणच्या देहप्रवृत्तींशीं संबंध असतो.

ज्या दोन गोष्टींविषयीं मानसशास्त्राच्या अभ्यासकानें विशेष विचार केला पाहिजे असें मी या प्रकरणाच्या प्रारंभीं सुचविलें, त्यांपैकीं पहिलीची चर्चा येथवर झाली. ती यापुढें अधिक न वाढवतां दुसऱ्या गोष्टीकडे आपण आतां वळूं. ती गोष्ट ही, कीं आपण मानवी मनाचा अभ्यास करणार याचा अर्थ ज्या परिणत उत्क्रांतावस्थेंत आजच्या घटकेस मानवी मन आढळतें तिचा अभ्यास करणार. मानवी जातीचा पृथ्वीतलावर अवतार झाल्याला आज कित्येक शतकें लोटलीं आहेत. परंतु मनुष्याच्या देहाच्या मूळच्या ठेवणींत कांहीं विलक्षण क्रांति घडून आली आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. ज्या प्राचीन काळांत मनुष्यानें वानरस्वरूपाचा त्याग केला, आणि शेपटीचा अलंकार टाकून दोनच पायांवर उभें रहाण्यास व शरीर ताठ ठेवून चालण्यास आरंभ केला, त्या काळापासून आजच्या घटकेपर्यंत सहस्रावधि वर्षें लोटलीं आहेत हें खरें. परंतु येवढ्या कालावधींत त्याचा देह बहुतांशीं जसाच्या तसाच राहिला आहे. या कालांत बदल झाला असेल तर तो मानवी मनाच्या स्वरूपांत, शक्तींत, क्रियेंत आणि संवयींतच झाला आहे. मनुष्य सारखा अधिकाधिक सुसंस्कृत होत आला आहे असें आपण म्हणतों. इंग्रजींत Civilization हा शब्द

वापरतात, व ही Civilization सारखी वाढत आहे असें म्हणण्यांत येतें. या Civilization शब्दाचें साधेंसुधें भाषांतर करावयाचें झालें तर 'प्रगति' हा शब्द आपणांस वापरतां येईल, व आपणांस असें म्हणतां येईल, कीं आज हजारों वर्षें मनुष्याची अव्याहत प्रगति होत आहे. परंतु ही जी प्रगति होत आहे ती मनुष्याच्या 'देहा'ची होत आहे काय? नव्हे. मनुष्याचा देह, त्याचे देहधर्म, त्याचे देहव्यापार, त्याच्या देहप्रवृत्ती या सर्व गोष्टी मानवकोटीचा प्रथम उदय झाला त्या काळीं जशा होत्या तशाच आजही आहेत. त्यांचें तें मूळचें स्वरूपच आजही आपण निरंतर ध्यानांत वागविलें पाहिजे. **मानवी प्रगति याचा अर्थ मनुष्याच्या मनाच्या व्यापारांत, कार्यांत, संवयींत होत गेलेली क्रांति.**

मानव जातीच्या हजारों वर्षांच्या इतिहासांत मनुष्याच्या परिस्थितीचीं अनेक अवस्थांतरें होत गेलीं व या अवस्थांतरांचे परिणाम मनुष्याच्या साडेतीन हात इंद्रियगोचर देहापेक्षां त्याच्या अदृश्य मनाच्या धर्मावर व व्यापारावरच अधिक झाले आहेत. याचें एकच उदाहरण दिल्यास वाचकांची खात्री पटावयास हरकत नाहीं. असें पहा, कीं मनुष्य ज्या काळीं रानटी अवस्थेंत होता, तेव्हां तो मृगया करून आपलें पोट भरीत असे. हककें हलकें ही मृगयावृत्ति त्याला गैरसोईची वाटूं लागली व कृषीवलवृत्तीचा त्यानें स्वीकार केला. तो जमीन नांगरूं लागला व त्यांत पिकणाऱ्या धनधान्यावर उपजीविका करूं लागला. परिस्थितींतील या फेरबदलामुळें त्याच्या मनोधर्मात आणि मनोव्यापारांत प्रचंड क्रांति झाली. बीं पेरल्यानंतर तें उगवेपर्यंत धीरानें वाट पहावयाची त्याच्या मनाला संवय झाली त्याचें पूर्वीचें मृगयाप्रेमी चंचल व अधीर मन शांत व धीरगंभीर बनत चाललें. पूर्वींची मृगया एका हातीं होणें शक्य होतें, तर शेतीसाठीं चार सहा माणसांनीं एकत्र राबण्याची गरज उत्पन्न झाल्यामुळें त्याच्या मनांत सहकार्याची नवी हौस निर्माण झाली. कुटुंब-संस्था अधिक आवश्यक होत चालल्यामुळें आप्तस्वकीयांच्या प्रीतीचा नवीनच धर्म त्याच्या मनांत उद्भवला व वाढूं लागला. शेताचा मालक आणि शेतांत राबणारे गुलाम हा भेद हलकें हलकें रूढ होत गेल्यानें

मिरासदारीच्या कल्पना माणसाच्या मनांत उत्पन्न झाल्या. लग्नसंस्थेवर व कुटुंबसंस्थेवर या कल्पनांचा परिणाम होऊन स्त्रीपुरुषसंबंधाचाही विचार मनुष्याचें मन तदनुसारच करूं लागलें. शेतकीला अनुकूल व प्रतिकूल अशा सुष्ट व दुष्ट देवदेवतांचें अस्तित्व मानवी मनानें मान्य केलें, व त्या अनुषंगानें धार्मिक भावना मनुष्याच्या मनांत बळावूं लागल्या. सारांश, माणसानें मृगयावृत्ति सोडली व कृषीवलवृत्ति स्वीकारली, या एकाच स्थित्यंतरानें मानवी मनावर केवढा तरी परिणाम झाला !

याच प्रकारें मनुष्याच्या मनाची आज सहस्रावधि वर्षे सारखी वाढ होत आली आहे. ज्या मानसिक शक्ती प्राचीन काळीं अगदीं सुप्तावस्थेंत होत्या त्या हलकें हलकें अधिकाधिक जागृत होत गेल्या आहेत. मानवी स्मृति, कल्पनाशक्ति, तर्कशक्ति—इतकेंच नव्हे, तर प्रेम-द्वेषादि मानवी भावनांचेंही प्रयोजन—वाढत गेल्यामुळें मनुष्याचे प्राचीन काळांतील साधेसुधे मनोधर्म व मनोव्यापार आतां शिल्लक उरले नसून ते धर्म व व्यापार संख्येनेंही वाढले आहेत, आणि त्यांचें स्वरूपही अत्यंत गुंतागुंतीचें होऊन बसलें आहे. मात्र या गुंतागुंतीनें आपण भांबावून जाण्याचें कारण नाहीं. कारण मानवी मनोव्यापारांत विलक्षण क्रांति झाली आहे हें जसें खरें, तसें त्या क्रांतीलाही एक विवक्षित पद्धति व दिशा असल्याचें आढळून येतें हेंही खरें. ती दिशा ही, कीं **मनुष्य आत्मनिष्ठ होता तो उत्तरोत्तर अधिकाधिक समाजनिष्ठ होत गेला आहे.** आत्मनिष्ठता टाकून समाजनिष्ठता स्वीकारण्याचें हें कार्य माणसानें नेहमीं स्वखुषीनें व आनंदानेंच केलें आहे असें नव्हे. अनेक वेळां केवळ नाइलाज म्हणून मनुष्य समाजाशीं समरस होत गेला आहे. पण तें कसेंही असलें तरी मनुष्याच्या मनोव्यापारावर व मनोधर्मावर समाजनिष्ठतेचा रंग अधिकाधिक चढत गेला आहे यांत संशय नाहीं; आणि आज मानसशास्त्राचा अभ्यास करतांना या गोष्टीकडे मुख्यत्वें-करून लक्ष ठेवणें अगत्याचें आहे.

मीं वारंवार म्हटलेंच आहे, कीं आपल्याला नुसते मानवी मनोधर्मांचे तात्त्विक नियम समजून घ्यावयाचे नाहींत, तर कुटुंबरचना,

बालसंगोपन, शिक्षण, व्यापार, धर्म, राज्यकारभार इत्यादि अनेक सामाजिक व्यवहारांवर त्या नियमांचा नवा प्रकाश टाकून आपलें एकंदर जीवन अधिक सुखप्रद कसें करतां येईल तें पहावयाचें आहे. तें पाहतांना मनुष्याच्या देहधर्मांविषयीं उद्वेग अगर तिरस्कार न बाळगतां त्यांचें महत्त्व मान्य करण्यांतच अधिक हित आहे हा माझा पहिला मुद्दा; मनुष्यकोटीचा आणि पशुकोटीचा जन्यजनक संबंध असल्यामुळें मनुष्याच्या देहप्रवृत्ती बहुतांशीं पशूसारख्याच आहेत हें मान्य करण्यांत कमीपणा नसून, सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें आपला फायदा आहे, हा आतांपर्यंतच्या विवेचनांतला माझा दुसरा मुद्दा; आणि सहस्रावधि वर्षांच्या मानवी प्रगतीच्या इतिहासांत मनुष्याचे मनोधर्म बदलत व अधिकाधिक गुंतागुंतीचे होत गेले आहेत व त्या स्वरूपांतच आपण त्यांची ओळख करून घेतली पाहिजे हा माझा तिसरा मुद्दा. हे तीन मुद्दे विशद करतांना क्वचित् स्थळीं वाचकांस माझें विवेचन तितकेंसें मनोरंजक वाटलें नसेलही. परंतु पुढें येणाऱ्या अत्यंत मनोरंजक विवरणांतील मर्म पूर्णांशानें समजून घेण्याची वाचकांची इच्छा असल्यास त्यांनीं पूर्वार्धांतील ही शास्त्रीय चर्चा बुद्धीला थोडीशी तसदी देऊन समजून घ्यावी अशी सूचना करणें भाग आहे.

———

# प्रकरण ५ वें

आतांपर्यंतच्या विवेचनांत माणसाला 'मन' आहे, त्या मनाचा त्यानें अभ्यास करणें अवश्य आहे, त्या मनाच्या विविध गुणधर्मांचें व शक्तींचें सूक्ष्म अवलोकन केल्यास हा अभ्यास त्याला साधेल, अशा प्रकारची भाषा मी वापरली. आतां या भाषेंत एक महत्त्वाचा बदल मी करणार आहे, तो वाचकांनीं नीट लक्षांत घ्यावा. कारण, मी जी नवी परिभाषा वापरणार आहें तीमुळें नुसत्या भाषेंतच नव्हे तर भाषेच्या बुडाशीं असलेल्या 'मना' विषयींच्या रूढ व सामान्य कल्पनांतच एकदम बदल करण्यास मी वाचकांस सुचविणार आहे.

आपण सामान्यपणें असें समजतों, कीं 'मन' म्हणजे कांहीं तरी एक वस्तु आहे. ती इंद्रियगोचर अर्थातच नाहीं; पण पंचेंद्रियांस अवगत न होणारी अशी कांहीं तरी इंद्रियातीत स्वरूपाची का म्हणाना पण ती 'वस्तु' आहे. त्या वस्तूस कांहीं वेगळें नांव देता आलें तर बरें असें आपल्याला फार फार वाटतें; पण भाषेच्या दारिद्र्यामुळें म्हणा, अगर अन्य कारणानें म्हणा, मन म्हणजे एक अतींद्रिय अशी 'वस्तु' अगर 'पदार्थ' आहे असेंच अखेर आपण सामान्यपणें म्हणतों. हे शब्द गाळावयाचेच झाले तर फार फार तर आपण असें म्हणतों, कीं 'मन' हें पंचेंद्रियांस न कळणारें असें 'कांहीं तरी' आहे. पण हें म्हणतांनादेखील इंद्रियगम्य पदार्थांविषयीं जी आपली कल्पना असते, जवळ जवळ त्याच प्रकारची कल्पना आपण मनाविषयीं करतों. कारण मनाच्या शक्ती, मनाचे गुणधर्म अशी परिभाषा आपण वापरतोंच. रंगरूपांचें स्वामित्व जसें आपण जड पदार्थांस देतों, तसेंच कांहीं विवक्षित गुणधर्मांचें व शक्तींचें स्वामित्व मनाकडे आहे अशा अभिप्रायानें आपण बोलतों. मनाची तर्कशक्ति, मनाची स्मरणशक्ति, मनाचे विचार-विकार असे प्रयोग आपण सदा वापरतोंच कीं नाहीं? आणि हे वापरतांना सुगंध आणि सुस्वरूप यांचें स्वामित्व कमलिनीकडे आहेसें मानावें,

त्याप्रमाणें मानवी मन हें विविध गुणधर्मांचे व शक्तींचें 'स्वामी' होय अशीच कल्पना करून आपण चालतों कीं नाहीं?

पण, ही कल्पना शास्त्रशुद्ध नसून ती आपण आतां सोडली पाहिजे. कारण मनाचे विचार, मनाचे विकार, असे षष्ठी विभक्तीचे प्रत्यय जरी आपण सामान्यपणें करतों, तरी ते केवळ अलंकारार्थीच असतात. भाषेच्या सोयीसाठीं आपण ते करतों. त्या प्रयोगांनीं आपला नित्याचा सामान्य व्यवहार ठीक चालतो व म्हणून व्यावहारिक प्रयोजनापुरते ते वापरण्यास आपल्याला कधीं हरकत दिसत नाहीं. परंतु आतां ज्या अर्थी मानवी मनाचें अस्सल स्वरूप आपल्याला पहावयाचें आहे, त्या अर्थी ही नेहमींची व्यावहारिक परिभाषा शुद्ध आहे कीं नाहीं हें आपल्याला तपासून पाहिलें पाहिजे व ती शुद्ध नसेल तर तिच्यांत अवश्य तो बदल केला पाहिजे.

या दृष्टीनें विचार केल्यास हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे, कीं मानवी मन म्हणजे कोणी एक 'स्वामी,' व विचार, विकार, स्मृति, कल्पना इत्यादि शक्तींचा व गुणधर्मांचा समुच्चय म्हणजे त्याची कांहीं एक 'जिंदगी' या कल्पनेंत मोठीच चूक आहे. जड पदार्थ आणि त्यांचे गुण यांचें जें नातें आहे तें कांहीं 'मन' आणि ज्यांस आपण मनोधर्म म्हणतों त्यांचें नाहीं. हें पुस्तक जाड आहे, हा वृक्ष किडलेला आहे, हें पुष्प सुगंधी आहे, हा घोडा चपळ आहे, असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां तो तो पदार्थ आणि त्या त्या पदार्थाचा तो तो गुण, यांच्यांत एक प्रकारचें भिन्नत्व आपण मानतों व तें भिन्नत्व वस्तुतः असतेंच. पण, मनाचें व त्याच्या गुणधर्मांचें तसें नाहीं. 'बर्फाची शीतलता' या प्रयोगाचा जो अर्थ आहे तो 'मनाची स्मरणशक्ति' या प्रयोगांत नाहीं. 'मन' म्हणजे कांहीं एक पदार्थ व विचार विकार वगैरे त्याचे भिन्नत्वानें असणारे गुणधर्म ही समजूत शास्त्रशुद्ध नाहीं. त्या दोहोंत भिन्नत्व नाहीं. कारण, स्मृति नांवाची कांहीं एक विशिष्ट शक्ति आहे व तिचा संचार कधीं कधीं मनाच्या ठिकाणीं होतो असें थोडेंच आहे! किंवा तर्क म्हणून कांहीं एक शक्ति अगर धर्म आहे,

आणि तो धर्म मानवी मन प्रसंगोपात् स्वीकारतें अशांतली गोष्ट थोडीच आहे ? मनाची स्मरणशक्ति याचा खरा शास्त्रशुद्ध अर्थ स्मरणशक्तीच्या स्वरूपानें प्रतीत होणारें मन इतकाच. आणि त्याचप्रमाणें मनाचे विचार, मनाचे विकार यांचाही अर्थ त्या विचारविकाररूपानें कार्य करणारी मनःशक्ति इतकाच. मन व लौकिक परिभाषेनें ज्यांस आपण त्याचे गुणधर्म म्हणतों ते खरें पहातां भिन्न नसून एकरूपच आहे. हें एकरूपत्व इतकें निर्विवाद आहे, कीं त्याचा ज्या तत्त्ववेत्त्यांच्या मनावर आत्यंतिक परिणाम झाला त्यांनीं तर असें प्रतिपादण्यास प्रारंभ केला, कीं 'जड पदार्थ' व 'पदार्थगुण' हेही एकरूपच होत. गुणावांचून भिन्न असा स्वतंत्र 'पदार्थ' नाहींच. या गुणवादाशीं आपल्याला प्रस्तुत कांहींच कर्तव्य नाहीं. आपल्या दृष्टीनें महत्वाचा मुद्दा इतकाच, कीं मनाविषयींची रूढ समजूत टाकून देऊन आपण यापुढें असें मानलें पाहिजे, कीं मन याचा अर्थ पंचेंद्रियातीत अशी कांहीं तरी एक शक्ति असून विचार, विकार व संकल्प अशा विविध स्वरूपांनीं ती कार्य करीत असते.

माझ्या या विधानाबद्दल अजून कोणाच्या मनांत संशय उरला असेल तर तो उरूं नये यासाठीं एक गोष्ट मी त्यांस विचारतों. 'मनाचें अवधान' असा शब्दप्रयोग आपण नेहमीं वापरतों. परंतु हा प्रयोग वाच्यार्थानें खरा आहे काय? अर्थातच नाहीं. मन निराळें आणि त्याचें अवधान निराळें असें थोडेंच आहे? मन म्हणजे अवधान.

'अवधान' हा शब्द विवेचनाच्या ओघांत मला सुचला हें फार छान झालें. त्या शब्दाचा फायदा घेऊन मी तर आतां असें म्हणतों, कीं 'मन' नांवाची जी शक्ति मनुष्याच्या ठिकाणीं आहे ती अवधान-स्वरूपीच आहे; व मनाचे विविध गुणधर्म आणि विविध व्यापार असे ज्यांस आपण नेहमीं म्हणतों ते त्या एका अवधानशक्तीचेच विविध प्रकार होत. स्मरण म्हणजे त्या अवधानाची एक तऱ्हा, कल्पना म्हणजे दुसरी एक तऱ्हा, तर्क ही तिसरी एक तऱ्हा. ज्या क्षणीं अवधान बंद असेल त्या क्षणीं या सर्व तऱ्हाही बंद असणार; आणि जेव्हां जेव्हां अवधान सुरूं असेल तेव्हां तेव्हां या तऱ्हांपैकीं एक अथवा अनेक प्रगट

होणार. एकाला जर म्हटलें, कीं तूं अमुक एका गोष्टीकडे अवधान दे, पण विचार, विकार, तर्क, कल्पना, इत्यादि प्रकार मात्र अजिबात बंद ठेव, तर तें त्यास शक्य होईल काय? समजा, आपण एखाद्या केतकीपत्राकडे अवधानपूर्वक पाहूं लागलों तर काय होईल? आपल्याला आल्हाद होईल, तें केतकीपत्र हवेंसें वाटेल, आपल्या परिचयाच्या एखाद्या सुंदर स्त्रीच्या वर्णाशीं त्या केतकीपत्राच्या वर्णाची तुलना करणें आपल्याला सुचेल, नाना तर्क व नाना कल्पना उचंबळून येतील! असें होणें म्हणजेच मुळीं खरें अवधान! हे सारे प्रकार बंद ठेवायचे म्हटल्यास 'मूले कुठारः' या न्यायानें अवधानाचाच घात होईल! एखाद्या यंत्राप्रमाणें आपल्या दृष्टीचे किरण त्या केतकीपत्रावर पडलेले राहतील हें खरें; पण तेवढी क्रिया झाल्यास तें केतकीपत्र आहे, कीं तमाखुपत्र आहे हेंसुद्धां आपल्याला कळायचें नाहीं.

सारांश, मन म्हणजे अवधान. हें अवधान सुरू झालें, कीं त्याचे विविध परिपाक होतात. वस्तुबोध होतो, तर्क होतात, कल्पना उद्भवतात, त्या प्रत्येकाचा अवशेष मागें उरतो, विकारतरंग उठतात आणि संकल्प बनतात!

मनाची ही व्याख्या सर्वस्वीं माझ्या जबाबदारीवर मी करीत आहे. कोठल्याही पाश्चात्य मानसशास्त्रज्ञानें बरोबर या अर्थाची व्याख्या केलेली माझ्या वाचनांत नाहीं. Mind is attention असें सूत्र कदाचित् कुठल्याही इंग्रजी पुस्तकांत आढळणार नाहीं. परंतु, मला मनाविषयीं जी उपपत्ति ग्राह्यशी वाटते ती मी वाचकांपुढें ठेवीत आहे; आणि या माझ्या व्याख्येच्या साहाय्यानें मानसशास्त्रांतील पुष्कळसे सिद्धांत अधिक सोप्या भाषेंत मांडतां येतात कीं नाहीं हें पुढील प्रकरणांत त्या त्या स्थलीं वाचकांस दिसेलच.

मानवी मन अवधानस्वरूप आहे असें म्हटल्यानें कित्येक परंपरागत वेदांती शब्दांची उलटापालट झाल्यासारखी वाटून कांहीं वाचक कदाचित् त्या व्याख्येविषयीं साशंक होतील. त्यांची साशंकवृत्ति दूर करण्यासाठीं जुन्या वेदांती कल्पनांविषयींचे माझे विचार मी सांगणारच आहे; पण ते

येथें नकोत. या ठिकाणीं हाच विचार केला पाहिजे, कीं अवधान हें जर चित्-शक्तीचें मूळ स्वरूप, आणि बाकीचे मनोधर्म व मनोव्यापार हे जर त्याचे विविध परिपाक, तर मानसशास्त्राच्या प्रत्येक विद्यार्थ्याला प्रथम अवधानाचा सांगोपांग अभ्यास केला पाहिजे. वर मीं म्हटलेंच आहे, कीं मनुष्याचें अवधान सुरूं झालें, कीं त्या अवधानाचीं विविध स्वरूपें बनत जातात. आपल्या दृष्टीसमोर एखादा डोंगर असेल तर त्याचा व आपल्या नेत्रांचा संयोग झाल्याचें आपल्याला कळतें (Sensation), 'हा डोंगर!' असा 'वस्तुबोध' (Perception) होतो, व त्या डोंगराविषयीं तर्क (Conception) चालूं लागतो. म्हणजे इंद्रिय-संयोग (Sensation), वस्तुबोध (Perception), आणि तर्क (Conception) हीं मूळ अवधानाचींच एकाहून एक अधिक परिणत अशीं स्थित्यंतरें होत. मानसशास्त्रावरील पुष्कळशा ग्रंथांत एकंदर विषयाची विभागणी या तीन सदराखालींच केलेली आढळते. किंवा दुसऱ्याही एका पद्धतीनें मानसशास्त्राचा विषय विभागून मांडलेला आढळतो. Thought, Feeling आणि Will असे मनोव्यापारांचे तीन वर्ग कल्पून त्यांपैकीं एकेका वर्गाची क्रमानें चर्चा करण्याची प्रथा मानस-शास्त्रज्ञांत रूढ आहे. यांपैकीं दुसरी पद्धति मला अधिक सोयीची वाटते. Thought, Feeling, Will या तीन इंग्रजी शब्दांस विचार, विकार व संकल्प हे मराठी प्रतिशब्द वापरण्याचें मी ठरविलें आहें. यापैकीं विचार व विकार हे शब्द नेहमींचे ठरलेले आहेत, व 'संकल्प' हा शब्द नेहमींच्या 'इच्छा' या शब्दापेक्षां अधिक मार्मिक आहेसें वाटल्यानें मी तो नव्यानें प्रचारांत आणीत आहें.

तेव्हां आपण असें म्हणूं कीं एकंदर सर्व मनोव्यापारांची विभागणी **विचार, विकार व संकल्प** या तीन वर्गांत करतां येते व या तिहींचेंही मूलस्वरूप अवधान होय. अवधान सुरूं झालें, कीं त्याचा परिपाक होऊन विचार, विकार व संकल्प प्रगट होतात. अर्थात् मानसशास्त्राच्या विद्यार्थ्यांनीं प्रथम अवधानाचाच सूक्ष्म अभ्यास केला पाहिजे. अवधान सहजासहजी केव्हां लागतें, केव्हां लागत नाहीं,

लागल्यावर तें कधीं लवकर तर कधीं अवकाशानें कां लयास जातें, अवधानाच्या गतीला कांही मर्यादा आहेत किंवा नाहींत, अवधानाविषयीं कांहीं ठोकळ नियम बांधतां येतील किंवा नाहीं इत्यादि प्रश्न महत्वाचें व तितकेच मनोरंजकही आहेत. तेच आपण आतां हातीं घेऊं.

मानवी मन अवधानस्वरूप आहे असें म्हणण्यांत केवढी सोय आहे त्याचें प्रत्यंतर या ठिकाणीं येण्यासासारखें आहे. अवधानाचा सूक्ष्म अभ्यास करावयाचें आपण ठरविलें म्हणजे पहिली गोष्ट आपल्याला उघड उघड दिसते ती ही, कीं अवधानाच्या तीन वेगवेगळ्या तऱ्हा मानतां येतील. कित्येकदां आपलें मन कोणत्या तरी गोष्टींत अगर विचारांत पूर्णपणें गुंतलेलें असतें; तर उलट कधीं कधीं आपलें मन अमुक एका गोष्टींत असतें खरें, पण धडपणें नसतें, आणि केव्हा केव्हां तर आपलें मन अजिबात हजरच नसतें. मन या शब्दाऐवजीं 'अवधान' हा शब्द वापरून हीच गोष्ट अगदीं सोप्या तऱ्हेनें पुढें मांडतां येईल. मनुष्य ज्या वेळीं बेशुद्ध अवस्थेत असतो त्या वेळीं त्याचें अवधान पार नष्ट होतें. मनुष्याला मृत्यु आला म्हणजे नक्की काय होतें हें अजून कोणालाही छातीठोकपणानें सागता आलेलें नाहीं, व पुढें केव्हां सांगतां येईल असें मला वाटत नाहीं. परंतु, अधिक खोलांत शिरण्याचा हव्यास आपण सोडला तर आपल्याला असें म्हणतां येईल, कीं मृत्यूच्या वेळी मनुष्याचें अवधान कायमचें नष्ट होतें. तें पुनः कांहीं एका नवीनच स्वरूपांत सुरू होतें किंवा नाहीं कोणास ठाऊक? परंतु, ज्या स्वरूपांत तें त्या माणसाच्या ऐहिक जीवनांत प्रगट झालेलें त्याला व इतरांना दिसलेलें असतें, त्या स्वरूपाचा तरी कायमचा अंत होतो येवढें खास. म्हणजे मूर्च्छा व मृत्यु या अवस्था अवधानशून्यतेच्या अवस्था होत.

याच्या उलट जागृति, सुषुप्ति, स्वप्न इत्यादि अवस्थात अवधानाचें कार्य कमी अधिक प्रमाणांत चाललेलें असतें. 'कमी अधिक प्रमाणांत' या शब्दांकडे वाचकांनीं विशेष लक्ष द्यावें. समजा, मी

आगगाडींत बसून प्रवासाला निघालों आहे व एक अतिशय मनोरंजक कादंबरी वाचीत आहें. अर्थातच अशा वेळीं माझें अवधान त्या कादंबरीकडेच असणार हें उघड आहे. पण असा विचार करूं, कीं माझें अवधान त्या कादंबरीखेरीज दुसऱ्या कोठल्याही गोष्टीकडे मुळींच नसेल काय ? नसेल असें म्हणतां येत नाहीं. माझ्या अवधानाचा मुख्य केंद्र हातांतल्या कादंबरीवर साधलेला असेल हें तर खरेंच; पण तसा तो साधलेला राहूनही इतर किती तरी गोष्टींकडे माझें अवधान अस्पष्टपणें असणें अगदीं शक्य आहे. माझ्या शेजारचा इसम सारखा खोकत असेल तर त्याचें तें खोकणें किंवा समोरच्या माणसानें ओढलेल्या विडीचा दर्प, आगगाडींत चहा किंवा सोडा-लेमन विकणाऱ्या फेरीवाल्याचा आवाज, खिडकींतून आंत येणारी थंडगार हवा, आणि सतत चालणारा आगगाडीच्या चाकांचा खडखडाट इत्यादि सर्व गोष्टींकडे माझें ' अस्पष्ट ' अवधान असेलच असेल. ते असेल याला एकच पुरावा अगदीं पुरेसा आहे. तो हा, कीं कादंबरीकडे लागलेलें माझें ' स्पष्टावधान ' जर का थकलें व मंदावलें, तर अस्पष्ट अवधानाच्या क्षेत्रांतली कोणती तरी एक वस्तू झटकन् माझ्या स्पष्टावधानाचा विषय होईल. चाकांच्या खडखडाटाकडे मी अधिक स्पष्टपणें अवधान देईन व कदाचित् तो आवाज किती रेखीव लयीनें चाललेला आहे त्याचें मनाशीं आश्चर्य करीन, किंवा जो विडीचा दर्प केवळ माझ्या अस्पष्ट अवधानांत होता त्याकडे माझें अवधान स्पष्टपणें जाऊन मी त्या बांकावरून उठून दुसऱ्या बांकावर बसेन. माणसाचें **स्पष्टावधान** एखाद्या वस्तूवर अगर विचारावर खिळलेलें असतांना इतर अनेक वस्तूंकडे व विचारांकडे त्याचें **अस्पष्टावधान** असतें. याचा दुसरा पुरावा हवा असला तर असा, कीं अस्पष्टावधानाच्या क्षेत्रांतील एखादी वस्तु बंद होतांच तिचें तें बंद होणें चट्कन् ध्यानांत येतें. मघांचेंच उदाहरण पुनः घेऊन बोलावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल, कीं मी कादंबरी वाचण्यांत गढलों असतांना चाकांच्या खडखडाटाकडे माझें अस्पष्टावधान आहे किंवा नाहीं हें मला कळणार नाहीं; परंतु तो खडखडाट कांहीं कारणानें थांबल्याबरोबर कादंबरीकडे लागलेल्या

माझ्या स्पष्टावधानाला धक्का बसल्यावांचून रहाणार नाहीं. मी कादंबरी वाचणें थांबवीन आणि काय झालें तें पाहाण्यासाठीं खिडकीबाहेर डोकावून बघेन.

सारांश, अवधानाच्या एकंदर तीन तऱ्हा मानल्या पाहिजेत. **निरवधान** : म्हणजे अवधानाचा अभाव; **स्पष्टावधान** : म्हणजे अवधानाचा स्पष्ट प्रकार; आणि **अस्पष्टावधान** : म्हणजे अवधानाचा अस्पष्ट प्रकार. यांपैकीं अवधानाच्या स्पष्ट प्रकारालाच फक्त अवधान म्हणावयाचें आपण ठरविलें तर निरवधान, अवधान व अस्पष्टावधान या तीन संज्ञांनीं आपला कार्यभाग उरकेल.

मूर्च्छा व मृत्यु या दोन अवस्था सोडून दिल्या तर मनुष्याचें अवधान स्पष्टपणें वा अस्पष्टपणें सतत चालूंच असतें असें मानसशास्त्रज्ञ मानतात. मनुष्याला झोंप लागलेली असताना त्याच्या चित्‌शक्तीचें काम अजिबात थाबतें असें आता कोणी समजत नाहीं. सुषुप्ति व स्वप्न या अवस्थात फक्त येवढेंच घडतें, कीं नेहमींच्या स्पष्टावधानाचा प्रवाह थाबून केवळ अस्पष्टावधानाची क्रिया चालू रहाते. पूर्वीं मीं म्हटलेंच आहे, कीं माणसाचें अवधान सुरूं झालें, की विचार, विकार व संकल्प अशा विविध स्वरूपात त्याचा परिपाक होतो. अवधानाचे स्पष्ट व अस्पष्ट असे दोन प्रकार आहेत हें आपण आता पाहिलें. अर्थात् आपल्याला आतां असें म्हणणें प्राप्त आहे, कीं 'अवधान' ( म्हणजे अर्थातच स्पष्टावधान ) घडलें कीं त्यापासून उद्‌भवणारे विचार, विकार व संकल्प हेहि स्पष्ट स्वरूपाचे असतात; आणि अस्पष्टावधान घडलें कीं त्यांतूनही विचार, विकार व संकल्प तर निर्माण होतातच, पण ते अस्पष्ट स्वरूपाचे असतात

म्हणजे असेंच म्हणाना, कीं प्रत्येक माणसाच्या मानसिक जीविताचे दोन भाग आहेत. एक स्पष्ट व दुसरा अस्पष्ट. पाश्चात्य मानसशास्त्रज्ञ The Conscious Mind, व The Sub-Conscious Mind अशा दोन संज्ञा वापरतात त्या याच अभिप्रायानें. प्रातःकालच्या जागेपणाच्या पहिल्या प्रहरापासून तों रात्रीच्या झोंपेच्या प्रहरापर्यंत प्रत्येक

मनुष्याचें स्पष्टावधान नानाविध गोष्टींनीं वेधलें जातें, व त्या अवधानांतून स्पष्ट स्वरूपाचे नानाविध विचार, विकार व संकल्प उद्‌भूत होत असतात. आणि हें स्पष्टावधान चाललें असतांना–इतकेंच नव्हे, तर सुषुप्तीच्या वेळीं तें बंद झालेलें असतांना देखील–म्हणजे अहोरात्र आणि अष्टौप्रहर प्रत्येक मनुष्याचें अस्पष्टावधान शेंकडों गोष्टींनीं वेधलेलें असतें, व त्या अस्पष्टावधानाचा परिणाम म्हणून अस्पष्ट स्वरूपाचे अनंत विचार, विकार व संकल्प उद्‌भवत असतात. मनुष्याच्या मानसिक जीविताला सागराची उपमा देऊन असें म्हणता येईल, कीं या सागरांत विचार, विकार व संकल्प भरलेले आहेत, आणि याच्या पृष्ठभागावर जो जलसंचय दिसतो तो तर अफाट आहेच, परंतु त्या पृष्ठभागाखालीं, सामान्यपणें गुप्त व अज्ञात राहणारा असा जो जलसंचय आहे तो तर आपल्याला कल्पनाही करतां येणार नाहीं इतका अफाट आहे. या दोन विचार–विकार–संकल्प–संचयांचा परस्पर संबंध काय आहे, त्यांपैकीं खोल व अव्यक्त असणारा संचय कधीं उचंबळून वर येतो काय, येत असल्यास केव्हां व का येतो, आणि तसा तो उचंबळून वर आल्यावर काय काय परिणाम होतात, इत्यादि प्रश्न अत्यंत मनोरंजक आहेत. परंतु त्यांच्या चर्चेचा मोह या ठिकाणीं आंवरला पाहिजे. कारण, या प्रकरणांत आपल्याला अवधानाचे मुख्य प्रकार, व ढोबळ नियमच तेवढे पहावयाचे आहेत.

अवधानाचे मुख्य प्रकार कोणते ते आपण वर पाहिलेच आहेत. आतां आपण असा प्रश्न उपस्थित करूं, कीं आपलें अवधान–स्पष्ट वा अस्पष्ट–अमुक एका क्षणीं अमुक एका वस्तूकडे अगर विचाराकडे लागतें तें कां? कोणत्या नियमास अनुसरून? केवळ योगायोगानेंच तें लागतें, कीं त्याच्या त्या लागण्यांत कांहीं पद्धति आहे? पाण्याचा प्रवाह जसा योगायोगावर अवलंबून नसून, 'उंचावरून खोलाकडे' या नियमानें वाहतो, तद्वत् अवधानाच्या प्रवाहाला कांहीं शिस्त अगर नियम आहे कीं नाहीं? असल्यास तो नियम काय आहे?

या नियमाचा खुलासा मानसशास्त्रज्ञ पुढीलप्रमाणें करतात. ते म्हणतात, कीं अमुक एका व्यक्तीचें अवधान अमुक एका क्षणीं अमुक

वस्तूवर जडेल कीं नाहीं हें निश्चित करणाऱ्या गोष्टीचे मुख्यत: दोन वर्ग आहेत. ( १ ) एक तर ज्या वस्तूवर अवधान जडावयाचें त्या वस्तूंत कांहीं विवक्षित गुण असावे लागतात; आणि शिवाय ( २ ) ज्या व्यक्तीचें अवधान जडावयाचें त्या व्यक्तीची त्या क्षणींची मानासिक अवस्था विवक्षित प्रकारची असावी लागते. म्हणजे, ( १ ) **बाह्य वस्तुगत धर्म** आणि ( २ ) **व्यक्तिगत मनोधर्म** अशा दोन कारणांनीं अवधान निश्चित होतें.

यांपैकीं वस्तुगत धर्मांची प्रथम चर्चा करूं. कोणत्याही वस्तूकडे आपलें अवधान जेव्हां खेंचलें जातें तेव्हां अर्थातच तें त्या वस्तूचा आपल्या इंद्रियावर जो आघात होतो त्यामुळें. या आघाताचा मोठेपणा ही अवधानाची निश्चय करणारी पाहिली गोष्ट. अतिशय मोठा पर्वत लहानशा टेकडीपेक्षां चट्दिशीं अवधान ओढतो. वाद्याच्या नाजूक स्वरापेक्षां रस्त्यांतून जाणाऱ्या जाहिरातीच्या बॅण्डचा कर्कश आवाज चट्कन् अवधान खेंचून घेतो. स्पर्श, गंध इत्यादि सर्वच बाबतींत हा न्याय लागू आहे. तसेंच स्थिर पदार्थांपेक्षां गतिमान पदार्थांकडे अवधान सहजासहजीं लागतें. उभ्या असलेल्या आगगाडी-पेक्षां वेगानें धांवणाऱ्या आगगाडीकडे आपण अधिक तत्परतेनें अवधान देतो. या न्यायामुळेंच साध्या बाहुलीपेक्षां हात हालविणारी बाहुली लहान बालकास अधिक चित्तवेधक वाटते कीं काय कोणास ठाऊक ? बहुतेक तसेंच असावें. वस्तूची गति ही अवधान खेंचणारी एक मोठी गोष्ट आहे येवढें खरें.

परंतु या किंवा असल्या इतर वस्तुगत धर्मांपेक्षां माणसाच्या अंतस्थ मनोवृत्तीवर व मनोधर्मावरच अवधानाची क्रिया अधिक अवलंबून असते. एक तर, ज्या वस्तूकडे अगर विषयाकडे माणसाला विशिष्ट परिस्थिती-मुळें नेहमींच अवधान देण्याचा सराव होतो तिकडे त्याचें अवधान सहजासहजीं खेंचलें जातें. खेडवळ शेतकरी पहिल्यानेंच शहरांत येऊन हमरस्त्यांत हिंडूं लागला, कीं मागून येणाऱ्या मोटारनें आपल्या शिंगाचा केवढाही आवाज केला तरी तिकडे त्याचें अवधान जात नाहीं व अखेर

मोटार पाठीला लागली म्हणजे तो धडपडत दूर होतो असा अनुभव आहे, नव्हे काय? आणि उलट, शहरांत ज्यानें जन्म घालवला आहे असा माणूस कधीं चुकून हुरडा खाण्यासाठीं खळ्यावर गेला कीं, दूरदूरच्या फडांतले शेतकरी एकमेकांला हांक घालून कांहीं सांगत असतात; पण तें त्या नागर माणसाच्या अवधानांत कांहीं केल्या येत नाहीं, हा अनुभवही नित्यांतलाच नाहीं काय? या दोन्ही प्रकारांचें कारण हेंच, कीं त्या त्या व्यक्तीच्या अवधानाला विशिष्ट परिस्थितीमुळें ज्या मार्गांनीं जाण्याचा सराव झालेला असतो त्या मार्गांनीं तें अधिक सुलभपणें वाहतें. म्हणजे **बाह्य वस्तूपेक्षां व्यक्तीच्या स्वभावावर व संवयीवरच अवधान अधिक अवलंबून आहे असेंच म्हटलें पाहिजे.**

अवधानामुळें विचार–विकार–संकल्प उद्‌भवतात आणि या विचार–विकार–संकल्पामुळें पुढच्या अवधानाचा विषय निश्चित होतो, अशी ही चमत्कारिक गुंतागुंत आहे. विवक्षित क्षणीं माझे विचार, माझ्या भावना आणि माझे संकल्प ज्या स्वरूपाचे असतील, त्या स्वरूपाच्या अनुरोधानेंच त्या क्षणीं माझें अवधान कोणत्या वस्तूवर अगर विषयावर खिळेल तें अवलंबून असतें. मागें एकदां 'तुम्ही व आम्ही' च्या एका अंकांत एका 'धूम्रवलयां'त मीं असें लिहिलें होतें कीं, एरवीं रस्त्याच्या कोंपऱ्या कोंपऱ्यांवर बसलेल्या ज्या जोडेशिव्याकडे माणसाचें अवधान सहसा जात नाहीं, त्याकडे पायांतील वहाण एकाएकीं तुटल्या-बरोबर मात्र अवधान अगदीं तीव्रतेनें धांवतें. याचें कारण हेंच, कीं पायांतील वहाण तुटल्याबरोबर ती शिवून घेणें हाच त्या वेळचा मनांतला सगळ्यांत तांतडीचा संकल्प ठरतो. असें म्हणतात, कीं एखाद्या चिक्कू माणसाला अगदीं गाढ झोंप लागली असली आणि कितीहि मोठ्यानें हांका मारून तो उठत नसला तरी रुपया खण्‌दिशीं वाजतांच तो तावडतोब उठतो. तान्हें मूल जरासें रडल्याबरोबर अगदीं गाढ झोंपीं गेलेली आई झट्‌कन् जागी होते. ज्या माणसाला गाण्याचें विलक्षण वेड आहे त्याच्या कानीं रस्त्यानें जातां जातांना बाजूच्या घरांतून अगदीं क्षीण असा जरी मंजूळ ध्वनि पडला आणि तो इतरांना ऐकूं येण्यासारखा

नसला, तरी त्याला चट्कन् ऐकूं येतो व तो रस्त्यांत थबकून उभें रहायला कमी करीत नाहीं !

या सर्व उदाहरणांचा अर्थ हाच, कीं अवधान अल्पांशानें वस्तूंच्या गुणधर्मावर तर अवलंबून आहेच, पण तें बृहदंशानें कशावर अवलंबून असेल तर तें त्या त्या व्यक्तीच्या **मानसिक संवयीवर** आणि तिच्या त्या त्या वेळच्या **संकल्पावर** !

या सिद्धातांतून अनेक मनोरंजक प्रश्न उद्भवतात, व आपल्या नित्याच्या लहान मोठया कार्यांत उद्‌भवणाऱ्या कांहीं अडचणींचा परिहार आपल्याला कसा करिता येईल या प्रश्नांचाही या सिद्धांतामुळें बराचसा उलगडा होतो. त्याची चर्चा पुढील प्रकरणांत करूं.

---

# प्रकरण ६ वें

विचार, विकार व संकल्प अशा तीन भिन्न भिन्न मानसिक शक्ति असून त्यांच्या विविध व्यापारांनीं माणसाचें मानसिक जीवन बनतें, अशी मानसशास्त्रज्ञांची कांहीं वर्षांपूर्वी समजूत होती. परंतु ही समजूत आतां विशेष कोणी मान्य करीत नाहीं. **विचार, विकार, व संकल्प या परस्परांपासून भिन्न अशा शक्ती नसून एकाच शक्तीचीं परस्परसंबद्ध अशीं तीन स्वरूपें आहेत,** हा सिद्धांत आतां सर्वमान्य झालेला आहे. या सिद्धांताचीच नवीन तऱ्हेची, व अधिक सुसंगत मांडणी करण्याच्या हेतूनें मला असें म्हणावेसें वाटतें, कीं माणसाचें मन म्हणजे त्याचें अवधान, व हें अवधान स्पष्ट किंवा अस्पष्ट प्रकारें सुरूं झालें, कीं कमी अधिक स्पष्ट विचार, विकार, व संकल्प उद्‌भवतात.

या विधानाचा उघडच अर्थ असा कीं कोणत्याही व्यक्तीच्या मानसिक घडामोडींच्या बुडाशीं त्याचें 'अवधान' असतें. व्यक्तीचे कमी अधिक प्रगल्भ विचार, बऱ्या अगर वाईट वासना, सुखदायक अगर दुःखदायक भावना, आणि यशस्वी अगर अयशस्वी कृती—या सर्वांचें आदिकारण त्या त्या व्यक्तीच्या अंगीं असलेली अवधानशक्ति होय. अर्थातच मानसशास्त्राचें मार्मिक ज्ञान आपल्याला करून घ्यावयाचें असेल, व त्या ज्ञानाच्या सहाय्यानें आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाची घडी नीट बसवावयाची असेल, तर अवधानशक्तीचाच पुरेसा व सूक्ष्म अभ्यास आपण केला पाहिजे. रोजच्या संसारांत आपण कांहीं व्यक्तींवर प्रेम करतों अगर कांहींचा द्वेष करतों, आपलें व कांहीं लोकांचें नीट पटतें अगर पटत नाहीं, आपल्या लहान मुलांस आपण शिक्षण देऊं पहातों व आपला प्रयत्न सफल अगर विफल होतो, परंपरागत धर्म आपण स्वीकारतों किंवा त्यांतलीं अनेक वैगुण्यें दृष्टोत्पत्तीस आल्यानें खरा धर्म कोणता हें आपल्याला कळेनासें होतें, नीति-अनीतीच्या प्रश्नांनींही अनेक वेळां आपण गोंधळून जातों!—या साऱ्याच्या मुळाशीं आपण आपला स्वतःचा व इतरांचा मनुष्यस्वभाव नीट ओळखलेला नाहीं हेंच कारण

असतें. मानसशास्त्र शिकावयाचें याचा सरळ सोप्या शब्दांत अर्थ इतकाच कीं मनुष्यस्वभावाचें नीट शोधक नजरेनें अवलोकन करून मानवी व्यवहाराच्या मुळाशीं जे सामान्य सिद्धांत असतील ते समजून घ्यावयाचे. मानवी व्यवहार म्हणजे विचार, विकार, व संकल्प यांनीं बनलेलें मोठ्या गुंतागुंतीचें जाळें आहे; आणि विचार, विकार, व संकल्प हीं जर एका अवधानाचीं परिणत स्वरूपें असतील तर **साऱ्या मानवी सुखदुःखांचा, आणि यशापयशाचा उगम अवधानक्रियेच्या निर्दोष अगर सदोष स्वरूपांत आढळला पाहिजे** असें म्हणावयास हरकत नाहीं.

एक लहानसें उदाहरण घेऊं. समजा, एका आठ दहा वर्षांच्या मुलाला भूगोल शिकविण्याची आपल्यावर पाळी आली. आपण द्वीपकल्प, बेट, सरोवर इत्यादि व्याख्या त्याला घोकावयास लावल्या. परंतु, त्यानें त्या वीस वीस वेळां घोकूनसुद्धां त्याला त्या मुखोद्‌गत होत नाहींत असें आपल्याला दिसून आलें. असें झालें म्हणजे त्या मुलानें रडकुंडीस यावें, आणि आपण चिडावें व रागवावें, हें क्रमप्राप्तच आहे. अर्थात् या प्रकारांतून अनेक प्रकारचें दुःख निर्माण होणार. मानसशास्त्राच्या दृष्टीनें या प्रकाराकडे जोंपर्यंत आपण पहात नाहीं तोंपर्यंत या दुःखावर कांहीं इलाज नाहीं असें आपण समजतों. उलट ती दृष्टि थोडीशी ठेवून आपण जर या प्रकारचा विचार केला तर आपल्याला काय आढळून येईल ? जें ज्ञान त्या मुलाच्या मेंदूंत घालावयाचा खटाटोप आपण करीत असतों त्याचा तेथें शिरकाव कां होत नाहीं ? त्या मुलानें अमूक एक मनोव्यापार करावा अशी आपली धडपड असूनही आपला हेतु साध्य कां होत नाहीं ?

या सगळ्याचें उघडच उत्तर असें, कीं कोणताही मनोव्यापार उद्‌भवावयाचा असेल तर तो अवधानांतूनच उद्‌भवूं शकतो. त्या मुलाला व्याख्या मुखोद्‌गत होत नसतील तर त्याचें खरें कारण एकच, कीं आपण त्या मुलाच्या ठिकाणीं अवश्य तें अवधान उत्पन्न करूं शकलों नाहीं. एखादा कुशल शिक्षक त्याच दुर्बोध व्याख्या त्याच

मुलाकडून सहज पाठ करवून घेतो तो एकाच युक्तीनें; आणि ती म्हणजे आधीं त्या मुलाच्या अवधानशक्तीला उत्तम प्रकारें चालना देणें.

ही चर्चा केवळ शिक्षणालाच लागू आहे असें नाहीं. यशाचे आणि अपयशाचे जे अनेक प्रसंग मनुष्याच्या नित्य अगर नैमित्तिक व्यवहारांत पुनःपुन्हा उत्पन्न होतात त्या सर्वांचाच या दृष्टीनें विचार करतां येण्यासारखा आहे. ज्याच्या हांतून कचेरींतलें काम नीटपणें होत नाहीं असा कारकून, ज्याचा माल कोणीही विकत घेत नाहीं असा फेरीवाला, ज्याचें प्रवचन कोणीही ऐकत नाहीं असा धर्मोपदेशक, ज्याचें आपल्या बायकामुलांशीं पटत नाहीं असा संसारी पुरुष, ज्याला सर्व सुखसमृद्धि असूनही आयुष्यांत गोडी वाटत नाहीं असा अभागी या सर्वांच्या दुःखाचें मूळ बहुतांशीं एकच असतें. **अवधान आणि यशःप्राप्ति यांचा किती निकट संबंध आहे** याची त्यांना कल्पना नसते.

पुष्कळ लोक आपल्याला असें सांगतात, कीं मनुष्याच्या अंगीं स्वतंत्र कर्तृत्व आहे. मनुष्य हा केवळ परिस्थितीचा गुलाम नसून तो तिचा निर्माता आहे. मनुष्यानें केवळ दैवावर अवलंबून न राहतां आपले प्रयत्न सतत चालू ठेवले पाहिजेत व त्या प्रयत्नांत यश आल्यावांचून रहाणार नाहीं असा विश्वास मनाशीं धरला पाहिजे.

हा उपदेश आपल्या सर्वांच्या चिरपरिचयाचा आहे; आणि 'प्रयत्नांतीं परमेश्वर' किंवा 'नर करणी करे तो नरका नारायण हो जायगा' असलीं कित्येक वचनें आपण केव्हां ना केव्हां तरी तोंडपाठ केलेलीं असतात. दैववादापेक्षां प्रयत्नवादावर विश्वास ठेवणें अधिक उपकारक असल्यामुळें असल्या वचनांचें स्मरण आपल्याला जितकें राहील तितकें चांगलें हेंही खरें. **परंतु मनुष्याच्या स्वतंत्र कर्तृत्वावर नुसता अंधविश्वास ठेवणें वेगळें, आणि त्या स्वतंत्र कर्तृत्वाचें खरें स्वरूप कशा प्रकारचें आहे त्याचा मनाशीं नीट उलगडा करून घेऊन तें चतुराईनें वापरणें वेगळें.** हा उलगडा मानसशास्त्राच्या दृष्टीनें आपण करूं लागलों तर ज्या 'अवधाना'ची

चर्चा आतांपर्यंत मीं केली त्या 'अवधाना'शींच त्या कर्तृत्वाचा संबंध असल्याचें आपल्याला दिसून येईल.

दैववादी आणि प्रयत्नवादी यांच्या मतांत नक्की फरक कोणता असतो तें पहाणें मनोरंजक आहे. दैववाद्यांचें म्हणणें असें दिसतें, कीं अमुक एक व्यक्ति अमुक एका क्षणाला कशी वागेल तें दैवानें निश्चित ठरवलेलें असतें. त्या बाबतींत त्या व्यक्तीस यत्किंचितही स्वातंत्र्य नसून सर्व गोष्टी नियतीच्या योजनेनुसार घडत असतात. समजा, एखादा मनुष्य एका श्रीमान् गृहस्थाकडे गेला आहे, व त्या श्रीमानाच्या सुसज्ज दिवाणखान्यांत त्याची वाट पहात बसला आहे. तो जेथें बसला आहे तेथें जवळच्याच एका टेबलावर एक अतिशय मौल्यवान अशी सिगारेट ठेवण्याची डबी पडलेली आहे. ती पहातांच ती चट्कन उचलून खिशांत घालण्याचा मोह त्या मनुष्यास होतो. पण त्याबरोबर अशी उचलेगिरी करणें बरें नव्हे असाही विवेक त्या माणसाच्या मनांत उभा रहातो. मग त्याच्या मोहाचें आणि विवेकाचें युद्ध सुरू होतें. अशा वेळीं तो मनुष्य अखेर काय करील ? ती डबी उचलून खिशांत घालील कीं नाहीं ?

या प्रश्नास दैववाद्यांचें उत्तर असें आहे, कीं अखेर काय करावयाचें तें त्या मनुष्याच्या हातीं यत्किंचित्सुद्धां नाहीं. त्याचें स्वतःचें पूर्वसंचित, वाडवडिलांपासून त्यानें उचललेले अनुवंशिक गुण, त्या क्षणींची परिस्थिति, इत्यादि अनेक गोष्टींस मिळून 'दैव' हें नांव दिलें तर या दैवाच्या आधीनच त्याची अखेरची वर्तणूक आहे असें म्हटलें पाहिजे. त्या मनुष्याच्या मनांत नानाविध प्रवृत्तींचें तुमुल युद्ध माजणें शक्य आहे, आणि हें युद्ध एक दोन मिनिटेंच न चालतां दहा पंधरा मिनिटें देखील चालेल हेंसुद्धां शक्य आहे. इतकेंच काय, अनेक वेळां माणसाच्या बुद्धीचा अनिश्चय दिवसानुदिवस, किंवा वर्षानुवर्षेंही कायम राहिलेला आढळतो. परंतु अनिश्चयाचा काळ अल्प असो अगर दीर्घ असो, तो संपवून अमुक एक निश्चित कृति करणें मनुष्याच्या स्वतःच्या हातीं मुळींच नाहीं. तें दैवाधीन असून आधींच ठरलेलें असतें, व एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें माणूस दैवाच्या

सूत्रानुसार वागत असतो. आपल्या उदाहरणांतला माणूस तीं सिगारेटची डबी उचलणार कीं जागच्या जागीं राहूं देणार हें आधीं पूर्णपणें ठरलेलें आहे, व त्याप्रमाणेंच त्या माणसाच्या हातून कृति होणार. त्या ठरलेल्या योजनेचा—मग ती योजना ईश्वरी समजा नाहीं तर सैतानी समजा—तो मनुष्य दास आहे. दासाप्रमाणेंच तो वागणार. तोच काय, सारींच माणसें सर्वदाच वागणार. कारण, मनुष्याला स्वतंत्र कर्तृत्व नाहीं.

उलट, प्रयत्नवाद्यांचें म्हणणें असें कीं अमूक एक व्यक्ति अमुक एका क्षणीं कशी वागेल तें सर्वस्वी त्या व्यक्तीच्या हातीं आहे. प्रत्येक व्यक्तीस स्वतंत्र कर्तृत्व आहे, व या कर्तृत्वानेंच प्रत्येक व्यक्तीच्या लहान अगर मोठ्या आचरणाचा अखेर निश्चय होत असतो. श्रीमंताच्या दिवाणखान्यांत एकटाच बसलेला आपल्या उदाहरणांतला माणूस अखेर काय करील हें कुणालाही आधीं वर्तविता यायचें नाहीं; कारण तें अगाऊ ठरलेलेंच नाहीं. त्या माणसाचें पूर्वसंचित, अगर अनुवंशिक गुण कसेही असले तरी त्या क्षणीं दुराचरण अगर सदाचरण करणें त्याच्या एकट्याच्या हातीं आहे. अमुक करावें किंवा करूं नये अशा स्वरूपाचा त्याच्या मनाचा उडालेला गोंधळ संपविण्याची शक्ति त्याच्या एकट्याच्या ठिकाणीं आहे. त्या शक्तीनुसारच त्याच्या हातून सत्कर्म किंवा दुष्कर्म होणार.

सकृद्दर्शनीं विचार केल्यास या दोन वादांतील कोणता ग्राह्य मानावा तें सांगणें कठीण आहे. रोजच्या व्यवहारांतील अनुभवाचाच पुरावा पाहिला तर दोन्ही वाद सारखेच समर्थनीय वाटूं लागतात. आपल्या भोंवतालचीं माणसें गुलामाप्रमाणें आपापल्या स्वभावधर्माच्या नियंत्रणानुसार वागत असलेलीं आपल्याला प्रत्यहीं दिसत असनात. तीं अमुक प्रसंगीं अमुक प्रकारें वागतील असें बिनचूक भविष्य वर्तविणें शक्य असल्याचें आपल्याला दिसून येतें. रस्त्यानें जातांना आपला एखादा स्नेही शेजारच्या क्रीडांगणावर चाललेली क्रिकेटची मॅच पहावयास क्षणभर थबकेल कीं नाहीं, फेरीवाल्यानें दारावर विकावयास आणलेलें उंची रेशमी कापड आपली शेजारीण विकत घेईल किंवा नाहीं, शेजारीं

पडलेल्या बाजाच्या पेटीवर आपला एखादा दोस्त हात टाकून पाहील कीं नाहीं, किंवा आपल्या ओळखीचा एखादा गृहस्थ चमचमीत जेवण झाल्यानंतर खिशांतली सिगरेट काढून शिलगावील कीं नाहीं—याबद्दलचीं भविष्यें आपल्याला आगाऊ सहज करतां येतात, व तीं खरींही ठरतात, हा अनुभव अगदीं नित्यांतला आहे.

पण याच्या उलट प्रकारचा अनुभवही तितकाच नित्यांतला आहे. आपला चिरपरिचयांतील स्नेही एखाद्या खटल्यांत आपल्या बाजूनें साक्ष देईल कीं आपल्या विरुद्ध साक्ष देईल, आपल्याला शेंदोनशें रुपये कर्जाऊ देईल कीं नाहीं, समाईक व्यापारांत इमान ठेवील कीं विश्वासघात करील—याबद्दलचें भविष्य निश्चितपणें करणें धाष्टर्याचें होय असेंच आपण नेहमीं समजतों.

सारांश, केवळ नित्यव्यवहारांतल्या अनुभवाचीच कसोटी लावली तर दैववाद खरा कीं प्रयत्नवाद खरा हें ठरविणें अशक्यप्रायच असतें. व्यवहार सोडला आणि वेदांताची कसोटी लावली तरी या दोन वादांतील भांडणाचा न्यायनिवाडा करणें सुलभ नव्हे हें व्यासंगी लोकांस माहितच आहे. म्हणून आपण या वादग्रस्त प्रश्नाकडे अगदीं निराळ्याच दृष्टीनें पाहूं या. ती दृष्टि म्हणजे मानसशास्त्राची.

या दृष्टीनें विचार करूं लागल्यास आपल्याला प्रथमच स्वच्छपणें सांगून टाकावीशी वाटते ती गोष्ट ही, कीं प्रयत्नवाद्यांची जर अशी कल्पना असेल, कीं मनुष्याच्या हातीं कर्तृत्व नांवाचें कांहीं तरी एक चमत्कारिक हत्यार आहे व जेव्हां जेव्हां अनिश्चय माजतो तेव्हां तेव्हां अखेर हें हत्यार वापरून मनुष्य एक घाव दोन तुकडे करतो, तर ती मुळींच खरी नव्हे. स्वतंत्र बुद्धि नांवाची कोणी एक राणी सिंहासनावर बसलेली असते व कार्याकार्याविषयीं भ्रांती जेव्हां जेव्हां माजते तेव्हां तेव्हां अखेर या राणीसरकारांकडूनच कांहीं तरी एक हुकूम सुटतो व मगच माणसाची भ्रांति संपून त्याच्या हातून कृति घडते असें समजण्यांत काव्य पुष्कळ असेल, पण तर्कशुद्धता मुळींच नाहीं.

तसेंच दैववाद्यांचें जर असें म्हणणें असेल, कीं मनुष्याच्या कोणत्याही कृत्यांत त्याची स्वतंत्र कर्तृत्वशक्ति कधीं प्रगट होतच नाहीं, तर त्या म्हणण्यांतही तर्कापेक्षां हट्टीपणाचाच भाग अधिक आहे. असल्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं दैववाद्यांना आपलें म्हणणें कांहीं झालें तरी सोडावयाचें नाहीं. कारण, मी एखाद्या प्रसंगीं परिस्थितीनें उत्पन्न केलेल्या मोहाशीं कितीही झगडलों व त्यावर विजय मिळवून स्वतःचें कर्तृत्व दर्शविलें, तरी जें कृत्य माझ्या हातून घडलें तें दैवसिद्धच होय असें प्रतिपादणें दैववाद्यांना अवघड जायचें प्रयोजनच नाहीं. मी मोहाला बळी पडलों तरी दैववादी म्हणणार, 'बाबा तुझ्या दैवांतच तसें लिहिलें होतें त्याला तूं काय करणार?' बरें मी मोहाला बळी न पडतां सत्कृत्य केलें तरी दैववादी म्हणणार, 'या वेळीं असें कृत्य तुझ्या हातून घडावें असेंच दैवाचें सूत्र होतें, त्यांत तूं तें मोठें काय केलेंस?' दुसऱ्याला चिडविण्याची लहान मुलांची एक अशी तऱ्हा असते, कीं तो बसला कीं म्हणायचें 'माझा हुकूमच आहे तुला बसण्याचा!' आणि उठला कीं म्हणायचें 'माझा हुकूमच आहे तुला उभें राहण्याचा!' या तऱ्हेसारखीच दैववाद्यांची तऱ्हा आहे! जें जें माणसाच्या हातून घडेल त्याच्या अखेर 'हेंच त्याच्या दैवानें ठरविलेलें होतें!' असा उद्‌गार काढायचा असें दैववाद्यानें ठरविलें तर त्याच्या तोंडाला तोंड देणें कठीणच आहे. पण म्हणून असला दैववाद कांहीं सिद्ध झालासें होत नाहीं. कारण असला वाद म्हणजे निव्वळ हटवाद! तर्क नव्हे तर तर्कट!

म्हणून आपण असें समजावें हें उत्तम, कीं **माणसाजवळ त्यानें वापरावयाचीच म्हटली तर 'स्वतंत्र बुद्धि' म्हणून कांहीं तरी आहे हें खास,** आणि हेंही खास, कीं ती स्वतंत्र बुद्धि कित्येक प्रसंगीं तो वापरीतच नाहीं. माणसाला कान आहेत, डोळे आहेत, हातपाय आहेत. पायांनीं चालावयाचें म्हटलें तर त्याला ते वापरतां येतात. पण चांगले धट्टेकट्टे पाय असूनही ऐदी किंवा श्रीमंत माणसें अंथरुणांत लंगड्या पांगळ्यांप्रमाणें पडून राहतातच कीं नाहीं? या शारीरिक शक्तीप्रमाणें 'स्वतंत्र बुद्धी'ची गोष्ट मानायला कांहीं हरकत नाहीं. ती मनुष्याच्या ठिकाणीं आहे हेंही खरें, पुष्कळदां माणूस ती

वापरतो हेंही खरें, आणि कित्येकदां तो ती वापरीत नाहीं हेंही खोटें नाहीं.

यावर अर्थातच असा प्रश्न उत्पन्न होतो, कीं मनुष्य कित्येकदां आपलें स्वतंत्र कर्तृत्व गाजवीत नाहीं म्हणजे काय करीत नाहीं ? आणि उलट तो तें पुष्कळदां गाजवितो म्हणजे काय करतो ?

मानसशास्त्राच्या दृष्टीनें या प्रश्नाचें उत्तर असें, कीं माणसाचें कर्तृत्व पंगू होऊन त्याच्या हातून घडणाऱ्या कार्यावर त्याची सत्ता नसल्यासारखी जेव्हां दिसते तेव्हां त्याच्या कर्तृत्वाच्या पराभवाचें खरें कारण असें असतें, कीं जें करावयाचें त्यावर त्याचें असावें तसें ' अवधान ' नसतें; आणि ज्या ज्या वेळीं मनुष्यानें इतर सर्व शक्तींस छेदून स्वतःच्या स्वतंत्र बुद्धीनें अमुक एक केलें असें आपण पाहतों, त्या वेळीं त्याच्या त्या कृत्याचें खरें कारण असें असतें, कीं त्यानें पुरेसें ' अवधान ' त्याकडे दिलेलें असतें. एक उदाहरण घेऊं म्हणजे मी काय म्हणतों तें वाचकांच्या स्पष्टपणें लक्षांत येईल.

समजा, रात्रीची वेळ आहे, आणि एका विद्यार्थ्यापुढें असा प्रश्न आहे, कीं रोजच्या संवयीप्रमाणें लवकर निजायचें, कीं परीक्षा जवळ आली आहे याची जाणीव ठेवून जागून अभ्यास करीत रहावयाचें ? अशा प्रसंगीं अभ्यास करीत जागण्याचा त्या विद्यार्थ्याचा प्रयत्न अयशस्वी झाला तर त्याची खरी मीमांसा ही, कीं आपल्या युक्त कर्तव्याच्या कल्पनेनें त्याच्या अवधानाचें केंद्र जितक्या तीव्रतेनें साधावयास पाहिजे तितक्या तीव्रतेनें साधलें नाहीं. विश्रांतीची कल्पना आणि कर्तव्याची कल्पना, अशा दोन कल्पना त्या विद्यार्थ्यापुढें आलटून पालटून उभ्या रहात असतात. या प्रकारालाच आपण ' अनिश्चय ' असें म्हणतों. ज्या दोन कल्पनांमध्यें—अगर अनेक कल्पनांमध्यें—मनुष्य हेलकावे खात असतो त्यांपैकीं जिच्यावर त्याचें अवधानकेंद्र साधतें ती अखेर प्रभावी ठरून तदनुसार माणसाचें वर्तन घडतें.

व्यसनी मनुष्य आपल्या व्यसनाचा दास होऊन बसतो, व त्या व्यसनापुरतें त्याचें स्वतंत्र कर्तृत्व नष्ट होतें याचासुद्धां अर्थ असाच लावतां येईल. दारूबाजाला आपल्या व्यसनाचा वाईटपणा कळत नाहीं असें थोडेंच आहे ? किंबहुना मद्याच्या दुष्परिणामांवर इतर कोणाला लिहितां येणार नाहीं असें प्रेक्षकांच्या चित्तवृत्ती खवळून टाकणारें नाटक मद्यपी लिहूं शकतो याचा पुरावा जगाच्या सर्व भाषांत सांपडण्यासारखा आहे. दारूचें व्यसन भयंकर घातक आहे हें मद्यप्याला कळत नाहीं असें नाहीं. मग तें सोडण्याच्या बाबतींत त्याचें स्वतंत्र कर्तृत्व कां बरें प्रभावी ठरत नाहीं ?

याचें उत्तर हेंच, कीं व्यसन सोडण्याच्या कल्पनेवर ऐन वेळीं त्याच्या अवधानाचें केंद्र साधत नाहीं. दिवसाउजेडीं मद्यपी स्वतःशी अनेक वेळां विचार करतो, कीं हें निंद्य व्यसन टाकावयाचें. त्या वेळीं ती गोष्ट त्याला फारशी कठीणही वाटत नाहीं. परंतु संध्याकाळची रोजची व्यसनाची घटका आली, कीं व्यसन सोडण्याच्या कल्पनेवरचें त्याचें अवधान दुर्बल व्हावयास लागतें. ती मावळतीची घटका, तें सुवर्णरंगी मद्य, तो मद्यपात्रांचा किण किण ध्वनि, तें मदिरापानाच्या वेळचें मित्र-मंडळींतील मनसोक्त संभाषण—या कल्पनाच त्याचें अवधान काबीज करून बसतात. व्यसन सोडण्याच्या कल्पनेवर त्याचें अवधान स्थिरच होत नाहीं. आणि असें झालें म्हणजे त्याला जें स्वतंत्र कर्तृत्वानें करून दाखवायचें होतें तें अशक्य होऊन, एखाद्या गुलामाप्रमाणें तो मद्यसेवनास उद्युक्त होतो.

सारांश, **कर्तृत्वशक्तीचें खरें स्वरूप म्हणजे अवधान—सामर्थ्यच होय.** मनुष्य जेव्हां जेव्हां दैवाचा दास असल्याप्रमाणें वर्तन करतो तेव्हां तेव्हां ज्या कल्पनेवर त्याचें अवधानकेंद्र साधलें पाहिजे तिच्यावर तें साधत नाहीं म्हणून त्याची वागणूक तशी होते; आणि उलट इष्ट कल्पनेवर मनुष्याच्या अवधानाचें पूर्ण केंद्र साधलें, कीं त्याला मोह, परिस्थिति, अनुवंशिक गुण, संवयी, अशा वाटेल त्या शक्तींवर विजय मिळवतां येऊन आपलें स्वतंत्र कर्तृत्व सिद्ध करतां येतें.

दैववाद आणि प्रयत्नवाद यांच्यांतील भांडणाचा मानसशास्त्रांतील नव्या सिद्धांतांच्या दृष्टीनें कसा विचार करतां येईल तें येथपर्यंत शक्य तेवढ्या सुबोध भाषेंत मी सांगितलें. परंपरागत वेदांताच्या अभ्यासकांना हें सारें सांगणें पटेलच अशी आशा मी मनाशीं धरलेलीच नाहीं. नवीन कल्पनांचें ग्रहण करण्याइतकी ज्यांची बुद्धि तरुण आहे आणि मानसशास्त्राच्या नवीन सिद्धांताचा स्वतःच्या ऐहिक कल्याणाकडे उपयोग करून घेण्याची ज्यांची तयारी आहे त्यांच्यासाठींच मुख्यतः हें विवेचन मी केलें आहे. पौर्वात्य अगर पाश्चिमात्य वेदांतानें केलेली मनुष्याच्या स्वतंत्र कर्तृत्वाबद्दलची चर्चा मी पुष्कळदां वाचलेली आहे. त्या चर्चेनें वादाचा कसलाच निकाल न होतां, जुन्या थाटाच्या पागोट्याचें भेंडोळें जसें कितीही उलगडलें तरी शिल्लकच रहातें तद्वत् त्या वादाला उभयपक्षीं अनेक फाटे फुटतात असें मला निःशंकपणें म्हणतां येईल. आणि त्या चर्चेत जे कांहीं अर्धवट निर्णय सांगण्यांत येतात त्यांचा प्रत्यक्ष व्यवहारांत कोणत्याही प्रकारें उपयोग करून घेतां येण्यासारखा नसतो असें म्हणण्यासही कचरण्याचें कारण मला दिसत नाहीं.

म्हणून माणसाच्या स्वतंत्र कर्तृत्वाबद्दल कोरडी वेदांती चर्चा करण्यापेक्षां, त्या कर्तृत्वाचें नक्की स्वरूप काय आहे तें समजून घेणें अधिक अगत्याचें व सूज्ञपणाचें होय; आणि तें समजल्यावर त्याचा आपल्या नित्यनैमित्तिक व्यवहाराकडे कसा उपयोग करून घेतां येईल तें पहाणें हें आपलें सर्वांचें त्याच्यापुढचें कर्तव्य होय. **इष्ट त्या कल्पनेवर अवधानाचें केंद्र साधण्याची शक्ति म्हणजेच स्वतंत्र कर्तृत्वशक्ति** हा सिद्धांत कसा ग्राह्य आहे तें आपण पाहिलें. आतां याच्या पुढचा प्रश्न असा, कीं या सिद्धांतापासून आपल्याला आपला फायदा कशा प्रकारें करून घेतां येईल ?

स्वतंत्र कर्तृत्व कोणाला नको आहे? आपल्या भोंवतालीं आपण नजर टाकल्यास बहुतेक स्त्री-पुरुष दैवाधीन दासाप्रमाणें वागत असलेले दिसतात. पण ते काय मोठ्या हौसेनें तसे वागतात ? एक तर स्वतंत्र

कर्तृत्व म्हणजे काय याचा त्यांनीं कधीं नीट विचार केलेला नसतो; किंवा आपलें कर्तृत्व अजमावून पाहण्याच्या त्यांच्या पहिल्याच प्रयत्नांत त्यांना अपयश आलेलें असतें, आणि त्यामुळें तेव्हांपासून आपल्याला स्वतंत्र कर्तृत्व नाहींच असें त्यांनीं मनाशीं ठरवून टाकलेलें असतें. या लोकांस जर स्वतंत्र कर्तृत्वाचें खरें स्वरूप नीट समजून सांगितलें व तें यशस्वी रीतीनें अमलांत आणण्याचा व्यवहार्य मार्ग त्यांस दाखवला, तर त्यांच्या अंगीं खिळलेला निराशावाद टाकून द्यावयास ते खचित तयार होतील.

विरोधास न जुमानतां, अडचणींना न भितां, आळसाचा मोह न होऊं देतां एखादें कृत्य ज्या वेळीं आपणांस करावयाचें असेल त्या वेळीं त्या कृत्याच्या कल्पनेवर आपलें अवधानसर्वस्व साधावें हीच साऱ्या कर्तृत्वाची आणि यशाची गुरुकिल्ली होय. गणिताची आवड नसतांनाही तो विषय तयार करूं पहाणाऱ्या विद्यार्थ्यापासून तों स्वराज्य-संस्थापनेसाठीं झटणाऱ्या मुत्सद्यापर्यंत सर्वांसच हा न्याय लागू आहे. व्यवहारांत आपल्या वांट्याला जें अपयश येतें त्याचें कारण कधीं कधीं सांगतांच येत नाहीं. कारण, या विश्वांत अब्जावधी शक्तींचें कार्य सारखें चालू आहे. त्या शक्तींच्या उलट सुलट क्रिया प्रतिक्रिया घडून आपल्या वाट्याला अखेर जें येईल त्याची सबंध कारणपरंपरा आपल्या नजरेच्या आटोक्यांतील नसते. पण हें जितकें खरें तितकेंच हेंही खरें, **कीं आपल्याला अपयश येतें याचें खरें कारण पुष्कळ वेळां असें असतें, कीं आपल्याला काय साध्य करावयाचें त्याची निश्चित कल्पनाच आपल्याला नसते व त्यामुळें त्या कल्पनेवर आपलें अवधान स्थिर झालेलें नसतें.**

मागच्या प्रकरणात मीं जी एक गोष्ट सांगितली ती वाचकांनीं या ठिकाणीं लक्षांत घ्यावी. ती अशी, कीं आपले विचार, विकार, संकल्प इत्यादि सर्व मानसिक घडामोडीचें मूळ अवधानांत आहे. मनुष्य ज्या वेळीं कोणतेंही कार्य करण्याची इच्छा करतो त्या वेळीं त्या त्याच्या इच्छेचा खरा अर्थ असा, कीं आपल्या परिस्थितींत त्याला कांहीं तरी बदल घडवून आणावयाचा असतो. हा बदल घडवून आणावयास

स्वतःचे हात पाय हीच काय ती यंत्रसामुग्री त्याच्या स्वाधीनची असते. या यंत्राची हालचाल व्हावयाची झाल्यास आधीं विचार, विकार, संकल्पाचीं चक्रें हाललीं पाहिजेत, आणि हीं हालण्याचें एकच साधन आहे. तें म्हणजे 'अवधान.'

अवधानाचा चमत्कार असा आहे, कीं त्याला मोकाटपणाची संवय एकदां लागली कीं ती अधिकच वाढत जाते, आणि उलट अमुक वस्तूवर अगर कल्पनेवर स्थिर होण्याचें त्यास वळण लावलें तर तेंही त्यास लागतें. ज्या विद्यार्थ्यानें आपल्याला गणित कधीं समजणार नाहीं असें समजून त्या विषयापुरतें आपल्या अवधानाला सदा मोकाटच सोडून दिलेलें आहे त्याच्या त्या करण्याचे परिणाम काय होतात पहा. त्याचें अवधान गणिताखेरीज इतर गोष्टींवर कमी अधिक प्रमाणांत जडत जातें, तसें तें जडत गेलें म्हणजे त्या गोष्टींविषयींचेच विचार, विकार, संकल्प उद्‌भवून दृढ होत जातात. तसे ते दृढ होत गेले म्हणजे अवधानाचा अधिकाधिक भाग त्या गोष्टींना चिकटत जातो, आणि असें झालें म्हणजे त्या गोष्टीवर जडलेला अवधानाचा मोठा संचय ओढून काढून तो अंशतः तरी गणित विषयाकडे वळविण्याचा प्रयत्न अधिकाधिक अशक्य होत जातो. याच्या उलट त्या विद्यार्थ्यानें प्रारंभींच गणित विषयाकडे थोडें जरी अवधान दिलें तरी त्याचे काय परिणाम होतील पहा. त्या अवधानांतून गणित विषयासंबंधींचे कांहीं तरी विचार, विकार, व संकल्प उत्पन्न झाल्यावांचून रहाणार नाहींत. तसे ते उत्पन्न झाले म्हणजे त्यांचा परिणाम घडून नंतर अवधानाचा प्रवाह थोड्या तरी अधिक सुलभ रीतीनें गणित विषयाकडे वळल्यावांचून रहाणार नाहीं. तसा तो वळला, कीं त्यांतून पुन्हा पोषक विचार, विकार व संकल्प उद्‌भवतील आणि त्यांची क्रिया पुन्हां घडून गणितावरील अवधानाची क्रिया अधिकच सुकर होईल.

लहानशा गोष्टीपासून मोठ्या गोष्टीपर्यंत हाच नियम लागू आहे, हें आपण नेहमीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. मागें सांगितलेंच आहे, कीं आपलें अवधान वस्तूच्या अगर विषयाच्या स्वरूपावर जरी अंशतः

अवलंबून असलें तरी मुख्यतः तें जर कशावर अवलंबून असेल तर तें आपल्या संकल्पावर. अवधान हें सर्व मनोव्यापारांचें मूळ होय हेंही खरें; आणि अवधानाचें मूळ संकल्पांत असतें हेंही खरें. कोणी म्हणतील, कीं हें सारें बोलणें कूटप्रश्नासारखें आहे, व त्याचा व्यवहारांत कांहींच उपयोग नाहीं. पण असें वाटूं देण्याचें कांहींच कारण नाहीं. अवधानांतून संकल्प उद्भवतात व संकल्पांतून पुढें अवधान उद्भवतें हें कूटवाक्यासारखें दिसतें व कोणी जर विचारलें कीं 'अहो, मग या अन्योन्याश्रित घडामोडींचा नक्की प्रारंभबिंदु कोणचा तें सांगा कीं!' तर चटकन् उत्तर देणें कठीण आहे. पण म्हणून वैतागून या बाबतींत आपल्याला आपला कांहींच फायदा करून घेतां येणार नाहीं असें ठरविण्याचें कारण नाहीं. कूटप्रश्नसुद्धां वादाच्या दृष्टीनें कूटासारखे दिसले तरी सामान्य व्यवहारांतील त्यांची उपयुक्तता मान्य करावी लागते. बीजावांचून वृक्ष निर्माण होत नाहीं व वृक्षावांचून बीज निर्माण होत नाहीं यांत संशयच नाहीं, आणि यामुळें बीज आधीं कीं वृक्ष आधीं हा प्रश्न सदैव कूटासारखाच रहाणार यांतही संशय नाहीं. पण असें आहे म्हणून बीजाचा व वृक्षाचा आपल्याला व्यवहारांत कांहींच उपयोग करून न घेतां आपण निराशेनें हात जोडून स्वस्थ बसलों तर तें कितीसें शहाणपणाचें होईल?

याच न्यायानें आपल्या मनोव्यापारांचें शास्त्र समजून घेऊन आपले नित्याचे व्यवहार यशस्वी व सुखदायक करण्याकडे आपण त्याचा उपयोग करून घेतला पाहिजे. मनुष्यास स्वतंत्र कर्तृत्व आहे असें आपण मानलें पाहिजे; तें कर्तृत्व प्रगट होणें अगर न होणें आपल्या स्वतःच्या अवधानक्रियेवर अवलंबून आहे ही समजूत आपण मनाशीं नित्य ठेवली पाहिजे; आणि **अवधानानें संकल्प सिद्ध होतात, व पुन्हा संकल्पांनीं अवधान सिद्ध होतें** हा दुहेरी न्याय लक्षांत ठेवून आपले सर्व व्यवहार अधिकाधिक शास्त्रशुद्ध व यशस्वी करण्याचा मार्ग आपण आक्रमिला पाहिजे.

---

# प्रकरण ७ वें

आपले 'अवधान' आपल्या सर्व मानसिक घडामोडींचें व तज्जन्य व्यापाराचें खरें आरंभस्थान होय, त्या अवधानांतूनच विचार, विकार, व संकल्प उद्भवतात, हा सिद्धान्त मान्य केल्यास पुढें प्रश्न उपस्थित होतो तो हा, कीं विचार, विकार व संकल्प या तिहींपैकीं आधीं काय उद्भवतें, व महत्त्वाच्या दृष्टीनें पहिलें स्थान कशाला द्यावयाचें? विचाराला, विकाराला, कीं संकल्पाला?

'मनुष्य हा विचारशील प्राणी आहे' ही व्याख्या आपण नेहमीं ऐकतों, व हरवख्त बोलूनही दाखवितों. त्यामुळें वरील प्रश्नाचें साहजिकपणेंच असें उत्तर द्यावेसें वाटेल, कीं विचार, विकार व संकल्प या तिहींत सर्वांत महत्त्वाची गोष्ट विचार हीच होय! विचार प्रथम, मग विकार व संकल्प! अवधानामुळें आधीं विचार सिद्ध होतात, व मग त्या विचाराच्या अनुषंगानें विकार व संकल्प यांचा प्रादुर्भाव होतो.

असें म्हणण्याचा मोह प्रथम प्रथम मानसशास्त्रज्ञांनाही आंवरतां आला नाहीं. त्यामुळें पाश्चिमात्य मानसशास्त्र प्रथम कित्येक वर्षे अशाच समजुतीवर आधारलें होतें, कीं 'विचार' हें मानवी मनोव्यापाराचें सर्वांत महत्त्वाचें स्वरूप होय. या समजुतीमुळें मानसशास्त्रावरील ग्रंथांत मनोविकारांची अगर संकल्पांची छाननी फारशा अगत्यानें केली जात नसे. विचार-क्रियेचीं गौणफलें इतक्या नात्यानेंच त्यांची संभावना करणें उचित समजलें जात असे. विवेचनाचा मुख्य भर विचार-क्रियेवरच दिला जाई. संवेदना (Sensation,) त्यानंतर वस्तुबोध (Perception), व त्यानंतर तर्कव्यापार (Conception), अशा क्रमानें मानवी व्यापारांची व्यवस्था लावण्यांत येई; व विचार किंवा तर्कव्यापार नक्की कशा स्वरूपाचा असतो, विचार-क्रियेमुळें विधान (Proposition) कसें बनतें, विचाराविचारांचे संयोग (Association)

कोणत्या नियमानुसार घडत जातात– इत्यादि चर्चेचेंच मानसशास्त्रांत प्राधान्य असे.

परंतु, अलीकडे अलीकडे ही समजूत पार बदलून गेली आहे. मनुष्य हा तर्कप्रधान अगर विचारप्रधान प्राणी नसून संकल्पप्रधान प्राणी आहे, मनुष्य या जगांत हात जोडून विचार करीत आयुष्य कंठीत नाहीं तर मुख्यतः तो सारखी कांहीं तरी कृति करीत असतो, तो आपल्या परिस्थितीशीं कमी अधिक प्रमाणांत रममाण होतो अगर झगडत असतो व तज्जन्य सुखदुःखांचे अनुभव घेत असतो, ही गोष्ट आतां अधिकाधिक मान्य होत चालली आहे. मानवी चरित्र म्हणजे विचार-मालिका नव्हे तर कृति-मालिका होय, असें समजण्याचा प्रघात अधिकाधिक पडत चालला आहे. आणि त्यामुळें अर्थातच मानसशास्त्रांत विचाराला जें उच्च स्थान पूर्वी दिलें जात असे तें आतां दिलें जात नाहीं. तें स्थान आतां संकल्पानें पटकावलें आहे.

मानसशास्त्रांत झालेली ही क्रांति उचितच कशी आहे तें थोडक्यांत दाखवितां येईल.

पहिली गोष्ट अशी, कीं आपण 'मानसशास्त्र' 'मानसशास्त्र' असा शब्दप्रयोग नेहमीं करतों खरे, परंतु त्याचा अर्थ असा करतां येईल कां, कीं 'मन' म्हणून कांहीं तरी स्वयंसिद्ध व पूर्णसज्ज गोष्ट आहे, व तिचें आपण शास्त्र तयार करणार आहोंत? नभोमंडलांत ग्रहोपग्रह व असंख्य तारकापुंज स्वतंत्रपणें अस्तित्वांत आहेत, व खगोलशास्त्र नांवाचें त्यांचें शास्त्र आपण बनवितों, तशी मनाची व मानसशास्त्राची स्थिति थोडीच आहे? आपल्या खिडकीलगत उगवणाऱ्या एखाद्या वृक्षाप्रमाणें मानवी मन म्हणजे कांहीं आपल्या नजरेपुढें उभा राहणारा पदार्थ नाहीं. त्याचें ज्ञान प्रत्यक्ष होत नाहीं, अप्रत्यक्षपणें तर्कद्वारांच होणार आणि हे तर्क कशावरून करावयाचे? तर माणसाच्या या जगांतल्या अनेकविध व्यापारांवरून व व्यवहारावरून! माणसाला मिळणाऱ्या बहुविध अनुभवावरून! तेव्हां खरें म्हटलें तर **'मानसशास्त्र' ही संज्ञा टाकून 'अनुभवशास्त्र' हें नवें नांवच आपण रूढ केलें पाहिजे.** आणि

तशी रूढि पडावयास अवकाश असला तरी निदान मानसशास्त्राचा अर्थ 'मानवी अनुभवाचें शास्त्र' असा समजण्याचा उपक्रम आपण ताबड-तोब केला पाहिजे.

पण 'अनुभव' म्हणजे काय ?

या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. अनुभवाची व्याख्या करा म्हटलें तर पंचाईतच आहे. अनुभव घेणें निराळें, आणि त्याची व्याख्या अगर वर्णन करणें निराळें. तें वर्णन कसेंहि केलें तरी समाधान-कारक वाटणार नाहीं. पारिजात पुष्पाच्या कोमलपणाचा अनुभव घेणें अवघड नाहीं, पण या अनुभवाचें वर्णन कोणत्याहि शब्दांनीं केलें तरी अपुरेंच पडेल. किंवा दाढदुखीचा अनुभव प्रत्येकाला केव्हां ना केव्हां येतोच हें खरें असलें, तरी त्याचें यथातथ्य वर्णन कधींच कोणाला साध-णार नाहीं! मात्र, अनुभवाची रेखीव व्याख्या आपल्याला साधत नाहीं तेव्हां त्याच्या चर्चेचा व शास्त्राचा नादच टाकून द्यावा म्हण-ण्याचेंही प्रयोजन नाहीं. कारण, 'अनुभव' म्हणजे काय तें व्याख्येनें सांगतां आलें नाहीं तरी आपल्यापैकीं प्रत्येकाला पुरें माहित आहे; आणि येवढी गोष्ट आपल्या कार्याला पुरेशी आहे.

आपल्या अनुभवासंबंधीं एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही, कीं अनुभवाच्या घटकेला आपण सर्वस्वीं स्तब्ध, निश्चेष्ट, निष्क्रिय असतों असें नव्हे. आपण छत्रीवांचून पावसांत सांपडलों, कीं पाऊस आपल्या अंगावर पडतो तसा अनुभव आपल्यावर पडत असतो असें मानलें तर तें खरें ठरणार नाहीं. या किंवा त्या पदार्थाचा, अथवा या किंवा त्या अवस्थेचा आपणांस अनुभव घडतो खरा; परंतु त्या अनुभवाच्या घटनेंत फक्त बाह्य पदार्थ अगर परिस्थिति तेवढी क्रिया करीत असते, आणि आपण मुकाट्यानें व निष्क्रियपणें ती घडूं देतों असें थोडेंच आहे? उदाहरणार्थ, रस्त्यानें जातांना एखाद्या विधुराला एक सुस्वरूप स्त्री दिसली, व ती दिसल्यानें तिच्या लावण्य-दर्शनाचा आनंद, व त्या स्त्रीच्या आणि त्याच्या मृत पत्नीच्या सारखेपणानें उद्भवणारी आठवण व तज्जन्य सूक्ष्म दुःख यांचा संमिश्र

अनुभव त्याला आला; तर त्या संमिश्र अनुभवांतला कांहीं भाग त्या विधुराच्या हातचा असेल कीं नाहीं? **म्हणजे अनुभव अंशतः बाह्य पदार्थामुळें बनलेला, व अंशतः अनुभव घेणाऱ्यानें स्वतःच बनविलेला** असतो असें नको का म्हणायला? आणि हा न्याय फक्त या उदाहरणांतील संमिश्र अनुभवासच नव्हे, तर अगदीं साध्या अनुभवास-देखील लागूं आहे असें नाहीं का म्हणतां येणार? सकाळीं उठतांच हवा चांगली अगर वाईट आहे असें आपण म्हणतों, आपल्यापुढें येणारा चहा आपल्याला आवडतो अगर आवडत नाहीं, आपलें दिवस-भरचें कामकाज आपल्याला प्रिय अगर अप्रिय वाटतें, आणि आपण आनंदानें अगर निरुत्साहानें शय्यासेवन करतों—**या साऱ्या विविध अनुभवांत बाह्य जगाचें जितकें अंग असतें, तितकेंच आपलेंही अंग असतें.** एका हातानें टाळी वाजत नाहीं, तद्वतच अनुभव कधीं केवळ बाह्य वस्तूनींच वडविलेला एकतर्फी नसतो. अनुभव उत्पन्न व्हावयास निवळ वस्तूचीच क्रिया होऊन भागत नाहीं, आपलीहि क्रिया घडावी लागते. अशा क्रियाप्रतिक्रियांनीं अनुभवाची सिद्धता होत असते. **आयुष्यांत जो जो लहान मोठा अनुभव आपण घेतों त्यांत एक पदर बाहेरचा आणि एक आंतला अशी गुंफण असते.**

मनुष्यप्राण्याच्या जीवनाला जीवशास्त्राचा मूलभूत नियम केव्हांही लागूं असणारच. तो नियम असा आहे कीं कोणताही सेंद्रिय प्राणी जगतो तो परिस्थितीवर बरी वाईट प्रतिक्रिया करीतच जगतो. ही प्रतिक्रिया अनेक दर्जाची असूं शकेल. अनुभव हा या प्रतिक्रियेचाच प्रकार आहे. अर्थात् अनुभवाच्या सिद्धतेस दोन गोष्टींची गरज आहे. एक बाह्य जग, आणि दुसरी म्हणजे जीवाचा जिवंत राहण्याचा अट्टाहास.

प्रचोदना, प्रेरणा, प्रवृत्ति, संकल्प—या साऱ्या या मूलभूत अट्टाहासाच्याच कनिष्ठ—वरिष्ठ तऱ्हा आहेत. मनुष्याच्या अनुभवाची आद्य कारणें दोन आहेत. एक त्याची स्वतःची संकल्पशक्ति आणि दुसरें कारण, तो ज्या निसर्गशक्तीच्या पसाऱ्यांत वावरतो त्या निसर्ग-शक्तीचा समुच्चय. आहार—विहारासारख्या साध्या व कनिष्ठ प्रतीच्या

अनुभवापासून तों एखाद्या गंभीर विषयावरील व्याख्यान ऐकण्याच्या वेळच्या संमिश्र, गुंतागुंतीच्या, वरिष्ठ प्रतीच्या अनुभवापर्यंत आपल्या कोठल्याही अनुभवाचें पोट चिरून पाहिलें, तर त्यांत ' प्राप्त ' आणि ' स्वकृत ' असे दोन अंश असतातच. आणि शिवाय या दोन्ही अंशांचे, गहूं–हरभरे एकमेकांत मिसळावे तसें मिश्रण तयार होत नाहीं, तर दोन द्रव्यें रासायनिक रीतीनें एकजीव व्हावीं तसें त्यांचें पूर्ण एकीकरण होऊन दोहींपासून भिन्न अशा तिसऱ्याच गोष्टीची सिद्धता होते. आपल्याला कमलिनीचा आल्हादकारक रंग दिसतो, किंवा शीतल जलप्राशनापासून आनंद होतो, किंवा मिस् मेयोनें लिहिलेल्या पुस्तकांतील विधानें वाचून अनावर त्वेष चढतो. या प्रत्येक अनुभवाची सिद्धता वस्तुगुण आणि संकल्प यांच्यायोगें झालेली असते हें जसें लक्षांत ठेवायचें, तसेंच प्रत्येक वेळीं जो अनुभव सिद्ध होतो त्याचें वस्तुगुणाशींही साधर्म्य नसतें आणि संकल्पाशींही नसतें, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. बाह्य वस्तु आणि आंतली संकल्पशक्ति यांच्यायोगें अनुभव उद्भवतो खरा, परंतु त्याचें स्वरूप त्या दोहोंहून भिन्न, स्वतंत्र असतें.

पण येवढ्यानें अनुभवाच्या स्वरूपाचा पूर्ण निर्देश होत नाहीं. कारण आतांपर्यंतच्या वर्णनांत अनुभवासंबंधींची एक गोष्ट गाळलेली आहे. ती गोष्ट म्हणजे प्रत्येक लहान मोठ्या अनुभवाच्या वेळीं अनुभव घेणाऱ्याच्या जीवतत्त्वाचें कमी अधिक प्रमाणांत घडणारें उद्दीपन. विषयसेवनाच्या क्षणीं प्रत्ययास येणारा उत्कट क्षोभ, किंवा हर्षाच्या, खेदाच्या अगर भयाच्या प्रसंगीं सर्वांगभर उठणारे रोमांच अथवा शहारे, हे या उद्दीपनाचे स्पष्टपणें लक्षांत येणारे प्रकार होत. हा उद्दी-पनाचा अंश नेहमींच इतका स्पष्ट असतो असें नव्हे. कधीं कधीं तो प्रयत्नानेंच समजेल इतका अस्पष्टही असेल. परंतु तो अनुभवाशीं नेहमीं निगडित असतो हें विसरून चालावयाचें नाहीं. अनुभवाच्या या अंगा-सच आपण विकार ( Emotion ) अशी संज्ञा देतों. सोप्या भाषेंत बोलायचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, प्रत्येक अनुभवाचा सुख-दायित्व अगर दुःखदायित्व म्हणून कांहीं तरी एक धर्म असतो. अनुभव

घेणाराची जिवंत राहण्याची जी धडपड तिला आपण 'संकल्पशक्ति' असें नांव दिलें, व आपण असें ठरविलें, कीं या संकल्पाच्या व बाह्य परिस्थितीच्या संघर्षणानें 'अनुभव' सिद्ध होतो. **या अनुभवाला सुखाचा अगर दुःखाचा एक पदर नेहमीं असतो हें आतां लक्षांत घ्यावयाचें.**

**अंतस्थ संकल्पानुसार माणूस प्राप्त वस्तूशीं अथवा अवस्थेशीं समरस होतो, अगर विरोध करतो. त्यांतून उत्पन्न होणारा अनुभव सुखदायी अगर दुःखदायी असेल त्या मानानें त्याचे पुढचे संकल्प निश्चित होत जातात व मग पुन्हा त्या संकल्पांतून विचार ( म्हणजे ज्ञान ), आणि सुखदुःखविकार उद्भवतात, व हा चक्रनेमिक्रम सतत चालू राहतो.** साखरेचा खडा पुढें पडलेला दिसला, कीं जें दिसेल तें तोंडांत घालून पाहण्याचा जो अकारण संकल्प लहान मुलांत निसर्गतः असतो त्यास अनुसरून मूल तो खडा तोंडांत घालतें. तसें त्यानें केलें, कीं दोन गोष्टी घडतात. एक त्या वस्तूचें थोडें फार 'ज्ञान' त्या मुलाला होतें; आणि खेरीज त्या वस्तूच्या मिळालेल्या अनुभवापासून त्याला सुखही होतें. या सुखाचा ( म्हणजे 'विकारा'चा ) परिणाम घडून ज्या संकल्पामुळें तें सुख मिळालें तो त्या लहान मुलाच्या ठिकाणीं दृढ होतो, व पुढें केव्हांहि साखरेचा खडा दिसला तर तो खाण्याचा संकल्प अधिक तत्परतेनें अंमलांत आणला जातो. उलट, नैसर्गिक संकल्पामुळें लहान मूल जेव्हां प्रथम जळत्या निखाऱ्याला स्पर्श करतें त्या वेळीं त्यांतूनही ज्ञान व विकार हीं दोन्ही निर्माण होतात खरीं, परंतु त्या वेळचा विकार दुःखस्वरूपी असल्यामुळें मूळच्या संकल्पाचा निग्रह होतो, व नंतर तो उद्भवतच नाहीं, आणि उद्भवला तरी अंमलांत आणला जात नाहीं. हा क्रम व न्याय एकंदर सर्वच मानवी अनुभवास लागू आहे.

म्हणजे मानवी 'अनुभवा'चें स्थूल स्वरूप कसें असतें असें कोणी आपणास विचारलें, तर आपण काय उत्तर दिलें पाहिजे तें आतां उघड झालें. आपण असें म्हणायचें, कीं मनुष्याच्या अंगीं निसर्गतःच कांहीं

तरी कृति करण्याचा 'संकल्प' असतो, या संकल्पाचे परिपाक म्हणून 'विचार' व 'विकार' उत्पन्न होतात, आणि या 'विकारा'च्या योगानें 'संकल्पा'चा जोर वाढून अगर कमी होऊन अनुभवाचें चक्र अखंड चालूं राहतें.

पण हें सांगणें म्हणजे केवळ अनुभवाचा सांगाडा कसा असतो तेवढेंच सांगण्यासारखें आहे. मानवी अनुभव म्हणजे साधा, पोकळ सांगाडा कधींच नसतो. शरिराचे जसे शीर, धड व हातपाय असे भिन्न भिन्न भाग आहेत तसे अनुभवाचे संकल्प, विचार व विकार असे भिन्न भिन्न भाग आहेत असें समजल्यास तें फार चुकीचें होईल. विचारविकारशून्य संकल्प, अगर संकल्पशून्य विकार किंवा विचार, अशा एकाच स्वतंत्र गोष्टीची सिद्धता शक्य कोटींतली नाहीं. प्रत्यक्ष अनुभवांत संकल्प, विचार, विकार अत्यंत निगडित झालेले असतात. त्यांची विलक्षण गुंतागुंत झालेली असते. किंबहुना, ही गुंतागुंत म्हणजेच मानवी अनुभवाचें वैशिष्टय. तेव्हां अर्थातच संकल्प, विचार व विकार असे तीन पदर अनुभवाला असतात येवढेंच समजून घेतल्यानें आपलें काम भागणार नाहीं, तर या पदरांची गुंतागुंत कशी होत जाते, त्यांच्या सुरगांठी, निरगांठी कोणत्या नियमानुसार पडत जातात तेंही आपणांस पाहिलें पाहिजे.

मानसशास्त्रज्ञांच्या मतें मानवी अनुभवाची जी वाढ आणि गुंतागुंत होत जाते तिच्या बुडाशीं तीन नियम अगर क्रिया आहेत. इंग्रजींत त्या क्रियांस Retention, Cohesion व Selection अशीं नांवें देतात. मराठींत '**धारण**', '**संयोग**' व '**निवड**' अशा साध्या संज्ञा वापरण्याचें मी ठरविलें आहे. या तीन क्रियांचें स्वरूप नीट समजलें म्हणजे मानवी अनुभवाचीं मूलतत्वें आपणांस समजलीं असें मानतां येईल. म्हणून त्यांचा थोडा विस्तारानें विचार करूं.

प्रत्येक लहान मोठ्या अनुभवास धारणाचा नियम लागू आहे. अनुभव केवळ प्रत्यक्ष घडण्याच्या कालमर्यादेपुरता घडतो, व ती कालमर्यादा संपली कीं त्याचा मागमूसही उरूं नये अशा प्रकारें तो नष्ट

होतो असें मानणें सर्वस्वीं चुकीचें ठरेल. पाण्याची धार अळूच्या पानावर पडते तोंपर्यंत ती पानावर दिसते, पण ती थांबली कीं तिची खूणसुद्धां त्या पानावर उरत नाहीं, तसा प्रकार अनुभवाचा नाहीं. अनुभवाचें नेहमीं कमी अधिक अंशानें '**धारण**' होत असतें. **अनुभव घडतो, आणि प्रत्यक्ष घडण्याचा क्षण संपल्यानंतर अवशेषरूपानें मागें राहतो.**

उदाहरणार्थ, आपण मध्यान्हकालच्या सूर्यबिंबाकडे क्षणभर पाहिलें, व नंतर मान वळवून डोळे मिटले तरी धगधगीत तांबडा पट्टा आपल्याला दिसतो. तो कां दिसतो? तर सूर्यबिंबाचें प्रत्यक्ष दर्शन जरी बंद झालें तरी घडलेल्या दर्शनसंवेदनेचा (Sensation) अवशेष मागें उरतो म्हणून. आपल्या पंचेंद्रियांचा व बाह्य पदार्थांचा ज्या ज्या वेळीं संयोग होतो, त्या त्या वेळीं त्या पदार्थांचा थोडा फार ठसा इंद्रियावर उमटावा हा सामान्य नियमच आहे; आणि हा नियम केवळ इंद्रियनिष्ठ अनुभवालाच नव्हे तर सर्व प्रकारच्या अनुभवाला लागू आहे. आपल्या ठिकाणीं उद्भवणारे संकल्प, विचार, विकार या सगळ्यांचे अवशेष कमी अधिक प्रमाणांत मागें उरत असतात, आणि या अवशेषांचा रंग त्यानंतर घडणाऱ्या अनुभवावर चढत असतो. आपण 'स्मृति' अगर 'स्मरणशक्ति' असें जिला नेहमीं नांव देतों ती म्हणजे ही धारणक्रियाच होय. म्हणून स्मृति हें नांव वापरण्याऐवजीं 'धारण' हें अधिक अन्वर्थक नांव वापरण्याचें मीं ठरविलें आहे. मन म्हणजे कांहीं तरी एक नामरूपयुक्त पदार्थ असून त्या मनाच्या अवधान, स्मरण इत्यादि विविध शक्ति आहेत ही समजूतच कशी चुकीची आहे हें मीं पूर्वीच दर्शविलें आहे. तेव्हां 'धारण' नांवाची मानवी मनाची शक्ति असून, पोपटाला जसा प्रथम कंठ नसतो व मागून फुटतो तशी ही शक्ति प्रथम नसते, हळूहळू उद्भवते, व कालांतरानें लुप्तहि होते, असल्या समजुतीला माझे वाचक थारा देणार नाहींत अशी खात्री आहे. मोटारीचा एकेक भाग जसा सुटा आणि वेगळा असतो तशी धारणा म्हणजे मनाची एक सुटी, स्वतंत्र शक्ति नाहीं. तर प्रत्येक अनुभवाचें कमी अधिक काळ

धारण होणें हा एक अनुभवाच्या वाढीचा व गुंतागुंतीचा नियम आहे; आणि या धारणक्रियेची चर्चा करावयास सोपें जावें म्हणून फार तर 'धारण' हें नांव लक्षणार्थानें आपणांस वापरतां येईल. पुढें एका प्रकरणांत धारणेची सविस्तर चर्चा आपण करूं तेव्हां ही गोष्ट आपणांस लक्षांत घ्यावी लागेलच. सध्यां मुख्य मुद्दा येवढाच, कीं प्रत्येक लहान-मोठ्या अनुभवाचें अल्पकाल अगर दीर्घकाल धारण व्हावयाचें हें ठरलेलें आहे.

अनुभवाच्या गुंतागुंतीचें दुसरें कारण विविध अनुभवांचा घडणारा '**संयोग**'. आपल्या वेगवेगळ्या अनुभवांची स्थिति वाळूच्या कणाप्रमाणें नसून बायका पोळ्या करायसाठीं कणकेचा गोळा तिंबतात त्या पोळ्यांतल्या कणकेच्या कणांप्रमाणें असते. वेगवेगळे अनुभव एक-मेकांस चिकटतात. त्यांचा एकमेकांशीं संयोग घडतो. आणि कधीं कधीं तो संयोग इतका दृढ होतो, कीं त्या अनुभवांचा अगदीं एकजीव होऊन ते जणूं एकाच अनुभवाचे भाग होत असें म्हणण्याची पाळी येते.

रोजच्या व्यवहारांत आपल्याला अनुभवांच्या या संयोगक्रियेचा प्रत्यय अनेक वेळां येतो. समजा, आपली एखादी किल्ली हरवली आहे, व ती सांपडावी म्हणून आपण प्रयत्न करीत आहोंत. अशा वेळीं आपण काय करतों ? आपण ती अखेर वापरली अगर पाहिली असेल त्या वेळे-पर्यंत आपण आधीं मागें जातों, व तेव्हांपासून आतांपर्यंतच्या अवधींत आपल्या हातून जें जें घडलें असेल तें तें शक्य तितक्या सविस्तरपणें व सूक्ष्मपणें आठवीत बसतों. आपण असें करूं लागलों कीं एखादें दोऱ्याचें बंडल अगर फिल्मचें भेंडोळें हलकें हलकें उगडलें जावें त्याप्रमाणें भूत-कालांतल्या आपल्या अनुभवाची पट्टी उलगडत जाते. सामान्यपणें आपलें सारें लक्ष किल्ली परत सांपडण्याकडेच सर्वस्वीं वेधलेलें असतें, त्यामुळें आपली हरवलेली किल्ली आपण शोधून काढली येवढेंच आपल्या ध्यानांत राहतें, व ज्या उलगडणाच्या क्रियेमुळें तो शोध शक्य झाला तिचें महत्त्व आपण मानीत नाहीं. पण तिचें महत्त्व फार आहे. भूत-कालांतला अनुभव आपण हलकें हलकें उलगडून पाहतों म्हणूनच

हरवलेल्या वस्तू आपणांस पुन्हा सांपडतात. किल्ली सांपडेनाशी झाली म्हणजे आपण म्हणतों, (१) सकाळीं तर त्या किल्लीनें मीं कपाट उघडून पैसे काढले व वाण्याला दिलें, (२) त्यानंतर मीं काय बरें केलें ?–हो, मी कपडे घालून बाहेर गेलों, (३) त्या वेळीं मीं घाईत कोटाच्या खिशांत तर किल्ली टाकली नाहीं ? (४) तसें असेल तर त्या खिशांत ती पाहिली पाहिजे, (५) अरेच्या, त्या खिशांतही नाहीं !–मग ? (६) हां ! बरोबर आहे. मी हा कोट घालून मैदानावर गेलों आणि कोट हिरवळीवर काढून ठेवून क्रिकेट खेळलों, (७) खेळणें आटपल्यावर कोट घालतांना मीं तो दोन चार वेळां झटकला तेव्हां किल्ली खालीं पडली असावी !– मागच्या अनुभवाची सांखळी अशा प्रकारें दुव्यादुव्यानें उलगडली कीं मी घाईनें मैदानावर जाऊन पाहतों तेथें मला हवी ती किल्ली सांपडते !

पण अनुभवाची सांखळी अशी उलगडतां येते याचें कारण काय ?—तर आधीं ती दुव्यादुव्यानें सांधली गेलेली असतें हें ! ( ७ ) चा ( ६ ) शीं, ( ६ ) चा ( ५ ) शीं असा संयोग प्रत्यक्ष अनुभवाच्या वेळीं घडलेला आहे म्हणून नंबर ( १ ) च्या दुव्यापासून नं. ( ७ ) च्या दुव्यापर्यंत मला आठवणीच्या वेळीं जातां येतें. आणि संयोगाचा एकच धागा एकेका अनुभवाला चिकटलेला असतो असेंही नाहीं. एकाच अनुभवाच्या भोंवतीं अनेक धाग्यांचें जाळें बनून राहिल्याचाहि प्रत्यय आपल्याला कित्येकदां येतो. एखादें पद ऐकण्याच्या अनुभवाचा संयोग ( अ) ज्या गायिकेच्या तोंडून तें ऐकलें तिच्या स्वरूपाशीं, ( आ ) ज्या दिवाणखान्यांत तें ऐकलें तेथील एखाद्या तसबिरीशीं, ( ई ) ज्या मध्यरात्रींच्या शांत प्रहरीं तें ऐकलें त्या प्रहराशीं, ( ऊ ) जी आपली मैत्रीण त्या वेळीं आपल्याबरोबर होती तिच्या गळयांतल्या मूल्यवान मौक्तिक मालेशीं–अशा अनेक अनुभवांशीं जडेल, व मग आठवणीच्या क्षणाला कधीं त्या पदावरून तसबीर आठवेल तर कधीं त्यावरून मोत्यांच्या कंठयाची आठवण होईल. म्हणजे असें कीं **अनुभवांचे संयोग घडतात ते सरळ असतात तसे वांकडे तिकडेही असतात, ते एकमार्गी असतात तसे त्यांना अनेक फांटेही फुटलेले असतात.** संयोग कधीं नारळाच्या झाडासारखे सरळ तर कधीं आंब्याच्या

झाडाप्रमाणें शाखोपशाखांनीं युक्त असे कां बनत जातात, तसेंच कोणत्या विशिष्ट प्रकारच्या अनुभवांचा एकमेकाशीं संयोग सहजासहजीं घडतो अगर घडत नाहीं—इत्यादि प्रश्न या ठिकाणीं साहजिकपणेंच उद्भवतात, व ते मनोरंजकही आहेत. परंतु या ठिकाणीं आपल्याला त्या विस्तारांत शिरतां कामा नये. येथें आपल्याला लक्षांत ठेवायचें तें येवढेंच कीं, 'धारण' व 'संयोग' हे अनुभवाच्या वाढीला व गुंतागुंतीला कारणीभूत होणारे दोन नियम आहेत.

या दोन नियमांच्या जोडीला तिसरा एक नियम आहे. त्या नियमास **निवड** अशी संज्ञा देतां येईल. अनुभवाचें आद्य कारण माणसाच्या ठिकाणची 'संकल्प'शक्ति होय, या सिद्धान्तावरून हा 'निवडी'चा नियम क्रमप्राप्तच आहे हें वाचकांस सहज समजेल. माणूस हातपाय न हालवतां स्तब्ध राहतो आणि अनुभव पावसासारखा त्याच्या अंगावर पडतो असें नसून, माणूस आपल्या स्वयंप्रेरित हालचालीनें हा अगर तो अनुभव घडवून आणतो, हें जर खरें, तर अनुभवाच्या वाढींत व गुंतागुंतींत निवडीच्या नियमाचा सारखा अंमल चालू असावा हें उघड आहे. यदृच्छेनें जो अनुभव दाराशीं येईल त्याला आंत घेण्याऐवजीं शिकाऱ्याप्रमाणें पुढें होऊन हवा तो अनुभव माणूस टिपून काबीज करतो हा जर अनुभवाच्या घटनेचा मूलभूत सिद्धान्त आहे, तर अर्थातच अनुभवाच्या वाढींत आणि गुंतागुंतींत माणसाच्या संकल्पानुसार सारखी निवडानिवड चाललेली असते असें मानणें भागच आहे. म्हणजे असें, कीं अनुभवांचें 'धारण' व 'संयोग' व्हायचा हें ठरलेलें तर खरेंच, पण सगळ्याच अनुभवांचें सारख्याच अंशानें धारण होईल अगर सगळ्याच अनुभवांचा एकमेकांशीं सारख्याच सुलभपणें आणि सारख्याच प्रमाणांत संयोग घडेल असें समजतां कामा नये. 'धारण' व 'संयोग' होतांना 'निवड' चालूच असते. आणि ही 'निवड' कशामुळें होत असते ?—तर माणसाच्या 'संकल्पा'मुळें.

तेव्हां 'संकल्प' ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट होय. विचाराला आद्यस्थान देण्याची मानसशास्त्रांतली जुनी रूढि नष्ट होऊन 'संकल्प'

आद्यस्थानीं मानण्याची क्रांति मानसशास्त्रज्ञांनीं कां घडवून आणली तें अनुभवाच्या स्थूल स्वरूपाच्या व वाढीच्या या विवेचनावरून वाचकांस स्पष्ट समजेल असें वाटतें.

मनोव्यापारांचें शास्त्रशुद्ध स्वरूप आपल्याला समजून घ्यायचें असेल, आणि सामाजिक व्यवहार, शिक्षण, नीति, धर्म, स्त्रीपुरुषसंबंध इत्यादि सर्व मानवी व्यापारांची पायाशुद्ध छाननी व सुधारणा आपल्याला करावयाची असेल, तर 'संकल्प' ही साऱ्या मानवी क्रियांची आदिशक्ति होय, हें नवें तत्त्व आपण आपल्या समजुतींत नीट पक्कें बिंबवून घेतलें पाहिजे. मनुष्य हा विचारप्रधान प्राणी आहे हा सिद्धान्त खोटा आहे, व या सिद्धांतावर आधारलेलें सारें आचारशास्त्र, शिक्षणशास्त्र, व्यवहारशास्त्र चुकीचें आहे असें म्हणावयास आपण कचरता कामा नये. त्या साऱ्या शास्त्रांची कसून उजळणी करण्याची वेळ आतां आली आहे. मनुष्य संकल्पप्रधान प्राणी आहे. त्याच्या ठिकाणीं विचार उद्भवतात ते केवळ त्या त्या संकल्पांच्या सफलतेसाठीं. पशुपक्षी निसर्गाच्या प्रेरणेनुसार वागतात, आणि माणूस तेवढा सारखा तर्काच्या साहाय्यानें वागतो, या म्हणण्यांतला फोलपणा आतां मानसशास्त्रज्ञांना पूर्णपणें पटलेला आहे. किंबहुना, आजच्या मानसशास्त्रज्ञांचें असें सांगणें आहे, कीं 'प्रेरणा' आणि 'तर्क' यांच्यांत उच्चनीचतेचा भेद मानतांच येत नाहीं. त्या दोहोंचा खरा संबंध असा आहे, कीं काय करायचें अगर न करायचें तें 'प्रेरणा' ठरविते, आणि तें कसें करायचें अगर न करायचें तें 'तर्क' सांगतो. **म्हणजे प्रेरणेमुळें साध्याचा निश्चय होतो व तर्कामुळें साधनांचा निश्चय होतो.**

तेव्हां मानवी अनुभवाची आणि व्यवहाराची पायाशुद्ध छाननी व पुनर्घटना आपल्याला करायची असेल तर आपणांस असेंच म्हटलें पाहिजे, कीं जीवशास्त्राच्या नियमानुसार ज्या निकृष्ट जीवकोटींतून चढत चढत मनुष्य वर आला त्यांच्यापासून विविध प्रवृत्तींचा वारसा माणसाला मिळालेला आहे. हा वारसा बरोबर घेऊनच प्रत्येक मानवी

व्यक्ति जन्माला येते. **हें करावें, तें करूं नये अशा स्वरूपाचे अनेक 'संकल्प' प्रत्येक माणसाच्या ठिकाणीं जन्मतःच असतात. हे संकल्प म्हणजेच साऱ्या मानवी मनोधर्मांच्या, मनोव्यापारांच्या व व्यवहारांच्या बुडाशीं असलेली प्रचोदक शक्ति होय.** मनुष्य अन्न खातो तें त्याला जेव्हां भूक लागते तेव्हां व भूक लागते म्हणून, शय्यासेवन करतो तें विश्रांति हवी म्हणून, धंदा करतो तें संचयाचा अथवा कीर्तीचा संकल्प त्याच्या ठिकाणीं असतो म्हणून, लग्न करतो तें स्त्रीसमागमाचा व अपत्यप्रेमाचा संकल्प बळावतो म्हणून! आहार, निद्रा, मैथुन, प्रीति, भीति, इर्षा, राग—असे विविध संकल्प कमी अधिक प्रमाणांत उचल खातात म्हणून त्या त्या व्यक्तीच्या अगर व्यक्तिसमूहाच्या हातून ते ते व्यापार घडतात.

हा सिद्धान्त लक्षांत ठेवला, कीं मानवी व्यवहाराच्या सर्व शाखांकडे अगदीं नवीनच दृष्टीनें आपल्याला पाहतां येतें, व मैदानावर खेळण्याच्या खेळापासून तों नीतिअनीतीच्या प्रश्नापर्यंत साऱ्या बाबतींत आपले व्यवहार आपल्याला अधिक समजूतदारपणें व अधिक सुखाचे कसे करतां येतील याबद्दल किती तरी कल्पना सहज सुचतात. त्या कल्पनाचीच चर्चा पुढच्या प्रकरणापासून सुरू करायची आहे.

---

# प्रकरण ८ वें

येथपर्यंतच्या विवेचनावरून मनोव्यापारांच्या स्वरूपाविषयीं जे मुख्य मुख्य सिद्धांत मीं वाचकांसमोर मांडले, ते पुन्हां एकदां क्रमांक घालून एकापुढें एक नमूद करणें इष्ट वाटतें:—

(१) मनुष्याचे मनोव्यापार किंवा अनुभव तीन प्रकारचे असतात विचार, विकार व संकल्प.

(२) विचार, विकार व संकल्प यांमध्यें प्रधानस्थानीं विचार नसून संकल्प असतो.

(३) मनुष्य संकल्पप्रधान आहे. त्याच्या ठिकाणीं अनेक निसर्गदत्त 'प्रेरणा' आहेत. या प्रेरणांमुळे त्याला अमुक हवें आणि तमुक नको असें वाटतें. त्याच्या ठिकाणीं वासना निर्माण होतात, व या वासनांनुसार मनुष्य कर्मास प्रवृत्त होतो.

(४) हीं कर्में सुलभपणें व्हावींत एतदर्थ 'विचार' माणसाच्या उपयोगी पडतो. म्हणूनच म्हणावयाचें कीं माणसाचें 'साध्य' त्याच्या अंगच्या प्रेरणांमुळें अगर संकल्पामुळें ठरतें, आणि 'साधनें' विचारामुळें निश्चित होतात. 'काय' करावयाचें तें निसर्गदत्त प्रेरणा व त्यायोगें बनलेले संकल्प मनुष्याला सांगत असतात; व 'कसें' करावयाचें तें विचाराच्या योगानें मनुष्य ठरवीत असतो.

या सिद्धांतांची नोंद केल्यानंतर आपल्या प्रस्तुत चर्चेचा ओघ दोन भिन्न भिन्न दिशांनीं वळविणें सारखेंच शक्य आहे, व त्या दोहोंपैकीं कोणती दिशा आपण पत्करायची तें ठरविणें अगत्याचें आहे. एक दिशा म्हटली म्हणजे अशी, कीं यापुढें संकल्प, विचार व विकार हीं जीं अनुभवाचीं तीन स्वरूपें, त्यांपैकीं प्रत्येकाची सविस्तर छाननी करावयाची; आणि त्याचप्रमाणें धारण, संयोग व निवड असे जे अनुभवाच्या वृद्धीचे व गुंतागुंतीचे तीन नियम मागच्या प्रकरणांत सांगितले त्यांपैकीं

एकेकाची पुरी फोड करावयाची. या दिशेनें विवेचन झाल्यास पुष्कळच करतां येईल. शिक्षणक्रमांत लावलेल्या क्रमिक पुस्तकांत बहुतांशीं या विवेचनावरच भर दिलेला असतो. तें मनोरंजक नसतें असेंही नाहीं; पण आपण ज्या एका विवक्षित हेतूनें मानसशास्त्राचा विषय हातीं घेतला आहे त्या हेतूस या विवेचनाची विशेष आवश्यकता नाहीं.

आपल्याला मुख्यतः पहावयाचें आहे तें हें, कीं मनोव्यापारांच्या स्वरूपाविषयीं जे नवे सिद्धांत आज मान्य व प्रस्थापित होत आहेत त्यांच्या अनुरोधानें आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनांत कांहीं मूलभूत सुधारणा करणें अगत्याचें आहे कीं नाहीं, व त्या सुधारणा केल्यानें आपलें वैयक्तिक आणि सामाजिक सामर्थ्य आणि सौख्य वाढण्याची शक्यता आहे कीं नाहीं ? या प्रश्नापुरतें पाहिल्यास वर ज्या तऱ्हेच्या चर्चेचा निर्देश केला आहे त्या चर्चेचें अगत्य विशेष नाहीं. अनुभवाची वाढ व गुंतागुंत धारण, संयोग आणि निवड या तत्त्वांनुसार होते येवढी सामान्य समजूत आपल्या चर्चेला पुरेशी आहे. त्या प्रत्येक तत्त्वाचा सविस्तर उहापोह आपण गाळला तरी चालेल. तसेंच संकल्प, विचार, आणि विकार या तिहींपैकीं प्रत्येकाचें सूक्ष्म पृथक्करण करण्यांत वेळ घालविण्याचेंही आपणांस प्रयोजन नाहीं. अवधानाचे हे त्रिविध परिपाक आहेत, व त्यांमध्यें संकल्पाचें महत्त्व व सामर्थ्य सर्वांत अधिक आहे, येवढा सामान्य सिद्धांत आपण सतत नजरेसमोर ठेवला म्हणजे पुरें आहे.

वाचकांनीं वाटल्यास असें समजावें, कीं गेल्या सात प्रकरणांत माझ्या विषयाचा पूर्वार्ध मीं पुरा केला असून, आतां या प्रकरणापासून मी उत्तरार्धास प्रारंभ करीत आहे. मनोव्यापाराविषयींच्या अज्ञानामुळें अथवा त्याविषयींच्या विपर्यस्त कल्पना उराशीं बाळगल्यामुळें आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाची घडण कांहीं एका विशिष्ट प्रकारानें होत गेली, व ती पुढेंही तशी राहूं देण्याची इच्छा परंपरेच्या प्रेमामुळें आपल्या ठिकाणीं उद्‌भवली. ही इच्छा योग्य आहे कीं अयोग्य आहे. हा मुख्य प्रश्न आहे. आपले मानसशास्त्रविषयक सिद्धांत चुकले असतील, व त्यामुळें वैयक्तिक व सामाजिक जीवनासंबंधीं घालून दिलेले आचारनियम,

व रूढ केलेल्या पाप-पुण्याच्या कल्पनाही चुकल्या असतील, तर त्यांचा अंमल यापुढेंही चालूं द्यायचा कीं निर्भयपणें त्यांची पुनर्घटना करावयाची हा प्रश्न मी सर्वांत महत्त्वाचा मानतों. हा प्रश्न माझ्या अल्प मतीनें सोडवतां येईल तसा सोडवावा या हेतूनेंच मीं प्रस्तुत विषयास हात घातला आहे.

संसारांतल्या सर्व व्यवहारांच्या मुळाशीं मानसशास्त्राचीं तत्त्वें असतात. त्यांची जाणीव सामान्य माणसाला होत नाहीं; पण तीं असतात यांत संशय नाहीं. निर्दोष मानसशास्त्रावर वैयक्तिक व सामाजिक जीवनाची उभारणी झाली असेल तर तें जीवन सुखाचें झाल्यावांचून रहाणार नाहीं. संसारांतून दुःखबीजांचें सर्वस्वीं उच्चाटण करणें अर्थातच शक्य नाहीं. पण निदान ' सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें' याऐवजीं 'सुख पर्वताएवढें, दुःख पाहतां जवापाडें' असा उद्‌गार माणसाच्या तोंडून निघावा येवढा प्रयत्न आपल्याला यशस्वी करून दाखवितां येईल. आपल्या आजच्या वैयाक्तिक व सामाजिक जीवनांत पदोपदीं असंतोष, निराशा, दुःख, वैताग आणि विभ्रम उत्पन्न होतो याचें कारण माझ्या मतानें हेंच आहे, कीं आपल्या सर्व व्यवहारांच्या बुडाशीं मानवी स्वभावाविषयीं व मनोधर्मांविषयीं विकृत कल्पना आहेत. त्या दूर करून त्यांच्या जागीं शास्त्रशुद्ध कल्पना बसविल्या तर व्यक्ति व समष्टि या दोहोंचेंही जीवन आपल्याला अधिक ओजस्वी व सुखाचें करतां येईल. या हिशोबानेंच मानवी मनाच्या स्वरूपाची चिकित्सा गेल्या सात प्रकरणांत मीं केली. त्या चिकित्सेंत जीं मुख्य तत्त्वें वाचकांच्या मनावर मीं ठसविलीं तीं तत्त्वें आतां यापुढें आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाच्या विविध अंगांस लावून पहावयाचीं आहेत. मनुष्याच्या नैसर्गीक स्वभावाचें व मनोव्यापाराचें जें शास्त्रशुद्ध स्वरूप मीं प्रतिपादिलें आहे तें जर खरें असेल तर आपण सर्वांनीं आपले खाजगी व सामाजिक व्यवहार कोणत्या प्रकारें बदलले पाहिजेत, व तसे ते बदलल्यानें आपल्या सर्वांच्या वांट्याला येणारें सुख कसें वाढेल, त्याची चर्चा आतां या प्रकरणापासून करावयाची आहे.

माझ्या प्रतिपादनाच्या सोयीसाठीं एका मध्यम वयाच्या हिंदु पुरुषाचें उदाहरण घेऊं, व लौकिकाच्या, नीतीच्या आणि धर्माच्या रूढ कल्पनांचें व नियमांचें प्रतिपालन करीत वागतांना त्याला ' कोठें तरी मुळांतच मोठी चूक तर झालेली नाहीं ? ' अशी शंका कोणकोणत्या प्रसंगीं येते तें आपण पाहूं. उदाहरणांतील पुरुषाच्या त्या त्या शंका-स्थानांचा विचार करतांना त्याच्या त्या त्या असंतोषाचा व शंकेचा उगम विपर्यस्त मानसशास्त्रांत सांपडतो कीं काय, व तसा तो आपणांस सांपडल्यास त्या त्या ठिकाणीं शास्त्रशुद्ध मानसशास्त्राची योजना करून असंतोषाचें निराकरण आपल्याला करतां येईल कीं नाहीं तेंही आपण ठरवूं.

मला वाटतें, संसारी माणसाला चिंतेचा व असंतोषाचा प्रसंग आपल्या घरांतल्या घरांत पुनःपुन्हां येतो तो स्वतःच्या लहान मुलांबाळां-वरून. वास्तविक पाहतां लहान मुलें म्हणजे संसारांतील एका मोठ्या अनुपमेय आनंदाचा ठेवा होत. कवी त्या आनंदाचें वर्णन करतात तें उगीच नाहीं. परंतु हें जितकें खरें तितकेंच लहान मुलांमुळें नानाविध मानसिक यातना सोसण्याचा प्रसंग आईबापांवर येतो हेंही खरें. कारण, आईबापांना साहजिकपणेंच नेहमीं असें वाटत असतें, कीं आपलीं मुलें सुविद्य आणि सुवृत्त व्हावींत; आणि उलट लहान मुलें तर विद्येचें आणि सद्वर्तनाचे धडे घ्यावयास सहसा तयार नसतात. तीं हट्ट करतात, दांडगाई करतात, आणि मारामारी करणें, खोटें बोलणें, अशा गोष्टींची आवड दाखवतात. त्यांच्या या गोष्टी पाहिल्या, कीं आईबापांस साह-जिकपणें मोठी चिंता वाटते, कीं आपलीं मुलें वाईट निपजणार ! अशी चिंता वाटली, कीं तिच्या निवारणाचा उपाय म्हणून मुलास रागें भर-ण्याचा आणि प्रसंगीं देहदंडही करण्याचा मार्ग आईबाप स्वीकारतात. या उपायांमुळें हवा तो परिणाम घडण्याऐवजीं नको तेच परिणाम बहुतेक घडतात. मग आईबापांच्या असमाधानांत आणि चिंतेंत भर पडते, मुलांच्या ठिकाणीं आईबापांच्या प्रेमाविषयीं शंका उद्भवते, व संसारां-तील आनंदाचें एक रम्य स्थान उध्वस्त झाल्यासारखें होतें !

या साऱ्या प्रकाराचें मूळ कारण काय बरें ? मानशास्त्रविषयक कल्पनांतील मूलभूत दोषामुळेंच ही सारी दुःखपरंपरा उद्‌भवत नाहीं काय ? पाहूं.

आपल्या समाजांत बालशिक्षणाविषयीं आईबापांच्या व शिक्षकांच्या मनांत ज्या कल्पना आज आहेत त्यांच्या बुडाशीं मानसशास्त्रविषयक गाढ अज्ञान असल्याचें दिसून येतें. आईबापांना व शिक्षकांना वाटतें, कीं आम्हांला जें जें ठाऊक आहे तें तें मुलांच्या मनांत कोंबणें हाच शिक्षणाचा खरा अर्थ. मुलांना शिकवून मोठें करणें म्हणजे आम्ही ज्या गोष्टीस चांगलें म्हणतों व वाईट म्हणतों त्या त्या गोष्टींस तसेंच चांगलें वाईट म्हणावयाची संवय त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करणें. अर्थात् ही संवय मुलांच्या ठिकाणीं उत्पन्न करावयाची झाल्यास आत्यंतिक आज्ञाधारकपणा त्यांच्या ठिकाणीं प्रथम आणला पाहिजे, आणि आज्ञाभंगाच्या अंतिम परिणामाविषयीं आत्यंतिक भीति त्यांच्या ठिकाणीं रुजविली पाहिजे.

म्हणजे परंपरागत कल्पना आणि ज्ञान लहान मुलांच्या डोक्यांत कोंबणें हें शिक्षणाचें साध्य, आणि भय व जबरदस्ती हीं शिक्षणाचीं साधनें अशाच समजुतीनें आईबाप, वडीलधारीं माणसें, आणि शाळेंतील शिक्षकही लहान मुलांशीं वागत असल्याचें आपल्या समाजांत दिसून येतें. माझें हें वर्णन कानाला कदाचित् कडू वाटेल; परंतु शिक्षकांनीं व आईबापांनीं स्वतःच्या वागण्याची निःपक्षपातीपणानें छाननी करून पाहिली तर माझ्या वर्णनांत अतिशयोक्ति नाहीं हें त्यास कबूल करावें लागेल. शाळांतील शिक्षणक्रमाकडे दृष्टि टाकली तर अमुक एका कालावधींत अमुक इतक्या ज्ञानाचा संचय विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं झाला पाहिजे असा कटाक्ष ठेवलेला आढळतो. जणूं कांहीं ज्ञान अथवा विचार हेंच मानवी अनुभवाचें प्रधान अंग आहे. वास्तविक पहातां मानवी अनुभवाचें प्रधान अंग संकल्प होय हें आपण पाहिलेंच; परंतु आमच्या समाजांतलि बालशिक्षणाची व संगोपनाची पद्धति

सर्वस्वीं विपर्यस्त अशा गृहीत तत्त्वावर झालेली आहे. शाळेंतील शिक्षक आणि घरांतील पालक सगळेच अशा समजुतीनें चाललेले असतात, कीं लहान मुलांच्या ठिकाणीं विचाराचें प्राधान्य असावें, आणि ते विचार म्हणजे केवळ मोठ्या माणसांच्या विचारांचे प्रतिध्वनी असावेत. ही समजूत सतत उराशीं बाळगल्यामुळें शाळेंतल्या शिक्षणाची पद्धति आणि घरांत मुलांना वागविण्याची पद्धति सदोष झाली आहे; आणि त्यामुळें असंतोषाचे प्रसंग प्रत्यहीं उद्भवत आहेत.

शिक्षकांनीं काय किंवा आईबापांनीं काय, लहान मुलांच्या मनोधर्मांची शास्त्रशुद्ध कल्पना कधींही डोळ्यांआड करतां कामा नये. मनुष्य संकल्पप्रधान आहे हें जर खरें, तर लहान मूल अत्यंत संकल्पप्रधान असणार हें उघडच आहे. मनुष्य वयानें मोठा झाला, कीं विविध अनुभवांचे धकेचपेटे बसून त्याच्या ठिकाणच्या नैसर्गिक संकल्पांची बरीचशी छाटाछाट झालेली असते. त्यांपैकीं कांहीं शिल्लक राहिलेले असतात, पण पुष्कळसे गळलेले असतात. निसर्गदत्त प्रेरणांचा असा एक न्याय आहे, कीं त्यांची नैसर्गिक दिशा पुष्कळदां बदलते, आणि त्यांना अनुरूप असा विषय मुळींच मिळाला नाहीं तर दीर्घकालानंतर त्या नाहींशाही होतात. उदाहरणार्थ, खाद्यपदार्थ पुढें आला, कीं तो तोंडांत टाकणें ही एक निसर्गदत्त प्रेरणा आहे. परंतु अनुभवानें शहाणे झालेले मासे ज्याप्रमाणें गळाला तोंड लावण्याचें सोडून देतात त्याप्रमाणें एखाद्या माणसाच्या आयुष्यांत घडलेल्या विवक्षित प्रसंगामुळें तो मनुष्य आपल्या खाण्याच्या प्रेरणेची दिशा पार बदलून टाकील. किंवा अपत्यप्रेम ही जरी एक निसर्गदत्त प्रेरणा आहे तरी एखाद्या मनुष्यानें आमरण ब्रह्मचर्य पाळलें तर त्याच्या अंगची ती प्रेरणा अखेर नाहींशी होईल. म्हणजे वयानें वाढलेल्या मनुष्याच्या ठिकाणीं निसर्गदत्त प्रेरणांपैकीं सगळ्याच सारख्याच जागृत व कार्यक्षम असतात असें नाहीं.

लहान मुलांची गोष्ट मात्र अगदीं निराळी असते. भर पावसाळा संपल्यानंतर बियांचे मोड जमीन दुभंगून बाहेर पडावेत तद्वत् लहान

**मुलांच्या ठिकाणच्या साऱ्या निसर्गदत्त प्रेरणा बाहेर फुटूं पहात असतात.** मुलांचा उच्छृंखलपणा असें आपण ज्याला नांव देतों तो उच्छृंखलपणा म्हणजे केवळ साऱ्या स्वभावसिद्ध प्रेरणांचा जोर होय. वडील माणसांना तो गर्हणीय वाटला तरी वास्तविक तो तसा मानतां येणार नाहीं, आणि तो तसा मानण्याचें आईबापांनीं व शिक्षकांनीं सोडून दिल्यास बालसंगोपनाचें कार्य पुष्कळसें सुकर होईल.

कुणी विचारतील लहान मुलांचा उच्छृंखलपणा गर्हणीय नव्हे तर काय स्पृहणीय मानावा ? तो दाबण्याऐवजीं त्याला उत्तेजन द्यावें ? मुलांच्या ठिकाणच्या सगळयाच नैसर्गिक प्रेरणा सारख्याच वाढूं द्याव्यात ? त्यांत इष्ट अनिष्ट असा विवेक करण्यासारखा नाहींच ? आणि तो करण्यासारखा असेल तर त्याचा अंमल लहान मुलांवर वेळींच चालवायला नको ?

या प्रश्नांस खरें उत्तर असें, कीं **लहान मुलांच्या अंगच्या कांहीं प्रवृत्ती आपल्या मोठेपणाच्या दृष्टीनें दुष्ट आणि अनिष्ट वाटण्यासारख्या असतात हें जरी खरें, तरी त्या प्रवृत्ती पाहतांच त्यांचा आपण जितका बाऊ करतों तितका करण्याचें वास्तविक कारण नसतें.** एक तर असें, कीं लहान मुलांच्या दुष्ट प्रवृत्तीनें केलेल्या ज्या कृती आपणांस दिसतात त्यांत खरें पहातां अंतर्यामींचा दुष्टावा आपल्याला वाटतो तसा नसतो. उदाहरणार्थ, फुलपांखरें पकडून तीं दोऱ्यानें बांधणें किंवा त्यांचे पंख तोडणें हे लहान मुलांचे अगदीं ठरलेले चाळे आहेत. परंतु असले चाळे करण्यांत दुष्टाव्याचा हेतु मुलांच्या ठिकाणीं क्वचितच असतो. कांही तरी गंमत करण्यापलीकडे, आणि आंत न मावणाऱ्या धडपडीच्या प्रवृत्तीला वाव देण्यापलीकडे त्या कृतींत दुसरा उद्देश क्वचितच असतो. एखाद्या वर्ष दोन वर्षांच्या धष्टपुष्ट अचपळ मुलापुढें दुसरें एक लहान मूल ठेवलें तर तें त्याला ओढतें, ओचकारतें, किंवा त्याच्या नाकाडोळ्यांत बोटें खुपसायलादेखील कमी करीत नाहीं. पण त्यानें असें केलें म्हणून त्यावरून त्याचा दुष्टपणा का सिद्ध होतो ? आणि या उदाहरणांत दुष्टपणाचा तर्क करणें जसें चुकीचें तसेंच इतर उदाहरणांतही. मुक्या प्राण्यांचा छळ मुलांनीं केला म्हणून लगेच

तीं निर्दय, दुष्ट, पापी व्हायला लागलीं असें समजून घाबरून जाण्याचेंही कारण नाहीं, किंवा त्यांना चांगला देहदंड करून वठणीवर आणण्याचा बेत करण्याचेंही फारसें कारण नाहीं. इतकेंच नव्हे, तर एखाद्या मुलानें असत्य भाषण केलें, अथवा अपशब्द उच्चारले, अथवा चोरी केली तरी आपण आकाश पाताळ एक करावें असें त्यांत कांहीं नाहीं. याचा अर्थ मुलांना खोटें बोलण्याची अगर चोरी करण्याची संवय लागूं द्यावी असा नव्हे. याचा अर्थ इतकाच, कीं मुलानें एखाद दुसऱ्यांदा खोटें भाषण अगर चोरी करतांच त्याला ती संयव जडली असें जें आपण ठरवितों त्यांत सत्यापेक्षां आपल्या कल्पनेचाच भाग अधिक असतो. कारण, असल्या संवयी लहान मुलांना सहसा जडत नाहींत. **असल्या विक्षिप्त कृत्यांची प्रवृत्ति मुलांच्या ठिकाणीं निसर्गतः असते हें जितकें खरें तितकेंच ती प्रवृत्ति योग्य कालीं नाहींशी होते हेंही खरें.** ज्यानें लहानपणीं एकसुद्धां किडामुंगी मारली नाहीं, किंवा एकदासुद्धां फुलपांखराचे पंख तोडले नाहींत, किंवा खोटें भाषण अथवा चोरी केली नाहीं असा एक तरी माणूस दाखवितां येईल काय? पण ज्यांनीं लहानपणीं मुके पक्षी पकडले, कुत्र्याच्या शेपटीला फटाकड्या बांधल्या, वर्गांत मास्तरांना खुशाल खोट्या गोष्टी सांगितल्या, आणि प्रसंगीं चार दोन आण्यांची चोरीही केली, तींच सारीं माणसें आज मोठीं होऊन समाजांत कमी अधिक प्रतिष्ठेनें वावरत आहेत कीं नाहीं? त्यांच्या लहानपणच्या असत् प्रवृत्ती कायम टिकण्याऐवजीं सापाची कात गळावी तशा गळून पडल्याच ना? सारांश, लहान मुलांच्या प्रवृत्तींपैकीं ज्या अनिष्ट व घातुक वाटतात त्या निसर्गाच्या न्यायानेंच योग्य कालीं नाहींशा होतात असें मानायला हरकत नाहीं.

आणि याहूनही अधिक महत्वाचा मुद्दा असा, कीं लहान मुलाच्या ठिकाणच्या एखाद्या असत् प्रवृत्तीची वाढ प्रमाणाबाहेर होत आहे आणि तिचा उच्छेद त्वरित केला पाहिजे असें जरी आपल्याला वाटलें तरी या उच्छेदनाच्या कामीं **आपल्या हातून बुद्धिपुरस्सर अथवा अजाणतांदेखील लहान मुलावर यत्किंचितही जबरदस्ती होतां कामा नये. निदान त्या मुलाला अशा जबरदस्तीचा यत्किंचितही संशय येतां**

**कामा नये** अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे. लहान मुलांशीं वागतांना त्यांच्या मनोधर्माविषयीं एक मोठा नियम आपण लक्षांत ठेवला पाहिजे तो हा, कीं **त्यांच्या अंगीं स्वभावतः ’ स्वाभिमान ’ फार तीव्र असतो.** याला अहंकार, दुराग्रह, हट्ट, अशीं वाईट नांवें आपण पुष्कळदां देतों, पण तीं केवळ आपल्या कृत्रिम हिशोबानें. वास्तविक पहातां आग्रह किंवा चिकाटी हें एक मोठें जीवतत्त्व आहे. आपल्या परसूंच्या भिंतींतल्या एखाद्या फटींतून पिंपळाचें लहानसें रोपटें बाहेर फुटलेलें आपल्याला दिसलें म्हणजे तें आपल्याला नको असतें म्हणून आपण छाटून टाकतों; पण पुन्हां आठ दहा दिवसांनीं त्या फटींतून पिंपळाचीं दोन तीन सुंदर कोंवळीं पानें बाहेर डोकावतांना आपणांस दिसतात. आपण तीं पुन्हां छाटलीं तरी तें पिंपळाचें मूळ आपला हट्ट पुन्हां प्रदर्शित करतें. जी गोष्ट या मुळाची तीच मुलाची. **हट्ट किंवा आग्रह हें एक जिवंतपणाचें लक्षण आहे.** हें लक्षण वाईट नसून स्पृहणीय आहे. हट्टी आणि खोडकर मुलेंच पुढें कर्तृत्ववान होतात, याबद्दलचीं उदाहरणें इतिहासांतून वाटेल तितकीं काढून दाखवतां येतील. म्हणून लहान मुलांच्या असत् प्रवृत्ती काढून टाकण्याच्या प्रयत्नांत त्यांच्या ठिकाणच्या आग्रहबुद्धीला अगर अभिमानाला दुखविण्याचें मोठ्या माणसांनीं शक्य तों टाळलें पाहिजे.

माझ्या पाहण्यांत अशीं कांहीं मोठीं माणसें आहेत, कीं त्यांच्या मतें लहान मुलांचा सारा आग्रह पार खणून काढणें हेंच बालसंगोपनाचें व शिक्षणाचें आद्यतत्त्व होय. हीं माणसें म्हणतात, एखादें मूल ऐकत नसेल तर वाटेल तें करून त्याला ऐकायला लावलेंच पाहिजे. मुलांना जें आवडतें तें करूं देणें म्हणजे शिक्षण नव्हे, तर त्यांना जें आवडत नसेल तें करावयास लावणें म्हणजेच शिक्षण होय. एखाद्या घोड्याच्या शिंगराला टांग्याला जोडण्यापूर्वी ज्याप्रमाणें चोपून, झोडपून, आणि मऊ करून वठणीवर आणतात त्याप्रमाणें लहान मुलांना वठणीवर आणणें हें आईबापांचें व शिक्षकांचें खरें कर्तव्य होय. कांहीं माणसें मला माहित आहेत त्यांची तर अशी तऱ्हा असते, कीं त्यांना बिचाऱ्यांना बाहेरच्या

जगांत कुठेंच सत्ता गाजवितां येत नाहीं आणि त्यामुळे घरांतलीं लहान मुलें म्हणजे आपली सुलतानशाही गाजवण्याचा आयता हातीं सांपडलेला एक विषय अशा बुद्धीनें तीं मुलांशीं वागत असतात.

पण ही सारी वागणूक विपर्यस्त मानसशास्त्रावर आधारलेली असते, आणि तिचे वाईट परिणाम झाल्यावांचून रहात नाहींत.

मुलांच्या असत् प्रवृत्ती नाहींशा करावयाच्या असतील तर त्या करतांना **त्यांचा आग्रह आणि आपला आग्रह अशी झुंज लावण्यांत कधींच फायदा नसतो.** उलट त्यांच्या स्वाभिमानाचा फायदा घेऊन, आणि त्याचें सहकार्य संपादून आपल्याला करावयाचा तो प्रयत्न आपण केला तर त्याचे परिणाम अधिक इष्ट व अधिक सत्वर घडतात. लहान मुलांना शिक्षण द्यावयाचें याचा अर्थ बहुतांशीं येवढाच करतां येईल, कीं त्याच्या ठिकाणच्या नानाविध नैसर्गिक प्रवृत्तींत आणि संकल्पांत तारतम्य करावयास त्यांस शिकवावयाचें. हें शिकवितांना—किंबहुना लहान मुलास कोणतीही गोष्ट शिकवितांना-एक मोठी महत्त्वाची दक्षता शिकविणाऱ्यानें बाळगली पाहिजे. ती अशी, कीं **आपण दुसऱ्याकडून कांहीं शिकलों असें वाटण्याऐवजीं आपण आपल्या स्वतःच्या बुद्धीनें व स्वतंत्र कर्तृत्वानें अमुक गोष्ट शिकलों असें लहान मुलास वाटलें पाहिजे.** पुढारलेल्या देशांत शाळा—कॉलेजांतील शिक्षणक्रमांत शिकणाऱ्याच्या कर्तृत्वाला ( Initiative ) शक्य तितका अधिक वाव देण्यांत येतो तो याच कारणानें. अमुक गोष्ट माझी मींच शोधली आणि माहित करून घेतली ही जाणीव लहान मुलाच्या ठिकाणीं विलक्षण आनंद उत्पन्न करणारी असते, आणि म्हणून तिच्या संगतीनें जो ठसा कोंवळ्या मनावर उठतो तो सुलभपणें आणि कायमचा उठतो. पुस्तकी ज्ञान, पापपुण्याचे विवेक, धर्माधर्म यांतील भेद इत्यादि साऱ्या गोष्टी लहान मुलांच्या मनावर आयत्या तयार झालेल्या स्वरूपांत आणि जबरदस्तीनें बिंबविण्यांत फायदा नसून तोटाच अधिक आहे. **या गोष्टी लहान मुलांना आपल्या संकल्पांच्या धडपडींत, अडखळत, ठेंचकळत कां होईना, पण स्वतंत्रपणें शोधून, समजून घेऊं द्याव्यात हेंच मानसशास्त्राच्या दृष्टीनें अधिक हिताचें ठरेल.**

कोणी या ठिकाणीं विचारतील, कीं काय हो, तुमच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं काय, कीं मोठ्या माणसांनीं आपल्या संचित अनुभवाचा फायदा लहान मुलांस देऊं नये ?—आणि प्रसंगीं तो जबरदस्तीनें द्यावा लागला तर तसें करणें आपलें कर्तव्यच मानूं नये ? समाजानें रूढ केलेल्या आणि शेंकडों वर्षें टिकलेल्या पापपुण्याच्या, धर्माच्या आणि ईश्वराच्या कल्पना लहान मुलांच्या मनावर ठसवूं नयेत ? आणि त्या ठसवितांना जबरदस्ती आणि धाकदपटशा हींच सर्वांत अधिक परिणामकारक साधनें वाटलीं तर त्यांचा उपयोग करूं नये ?

याचें उत्तर असें, कीं आधीं मुळीं मोठ्या माणसांनीं आपल्या संचित अनुभवाचा फायदा लहान मुलास द्यावयाचा ही कल्पनाच वाटते तितकी शास्त्रशुद्ध नाहीं. कारण, तसाच विचार केला तर एका व्यक्तीच्या संचित अनुभवाचें ग्रहण केल्यानें दुसरी व्यक्ति शहाणी होते ही कल्पनाच मुळांत चुकीची आहे. शहाणपणा असा आयता घेतल्यानें कधींच येत नाहीं. तसा तो येत असता तर बालपण, तारुण्य, आणि वार्धक्य या शब्दांतच कांहीं मर्म राहिलें नसतें. मोठ्या माणसांनीं आपल्या संचित अनुभवाचे दिलेले धडे मुलांच्या मनावर बिंबविण्याची शक्यता खरोखरच असती तर, सारी विद्यार्थिदशा उनाडपणांत घालविणारीं मुलें केव्हांच लुप्त झालीं असतीं, लहानपणीं शरीर न कमावल्याबद्दल पश्चात्ताप करणारीं माणसें आढळलीं नसतीं, आणि संसार करतांना लहान मोठ्या चुका करून दुःखाचे सुस्कारे सोडणारे स्त्रीपुरुष पहावयासच सांपडले नसते. कोणतीही व्यक्ति जो कांहीं थोडा फार शहाणपणा कमावते, व ज्याचा त्या व्यक्तीला खरोखरच थोडा बहुत उपयोग होतो तो सर्व त्या व्यक्तीनें आपल्या संकल्पांचे आणि प्रेरणांचे प्रयोग करून पाहून व त्या प्रयोगांत कमी अधिक सुखदुःख सोसून संपादलेला असतो, आणि लहान मुलांच्या बाबतींत तर ही गोष्ट विशेषतः खरी आहे. चांफ्याच्या झाडावर चढूं नये ही गोष्ट एखाद्या हूड मुलाच्या मनावर मोठ्या माणसांनीं कितीही ठसवली तरी ठसत

नाहीं. तो मुलगा स्वतः चढून पडेल—आणि एकदांच नव्हे, दोन चार वेळां पडेल—तेव्हांच ती गोष्ट तो खरोखरी शिकतो. खोटें बोलूं नये, फार खाऊं नये, दिसेल तें मागूं नये, शिवी देऊं नये, शाळेच्या वाटेवर तमाशा पहात उभें राहूं नये या गोष्टी त्यांबद्दलच्या कविता घोकून मुलें शिकतात अशी कोणाची कल्पना असेल तर त्याला मुलांचे मनोधर्म व मनोव्यापार यांबद्दल पुष्कळ शिकायचें उरलें आहे असें म्हटलें पाहिजे. इसापच्या सुंदर अन्योक्तिपूर्ण गोष्टींच्या शेवटीं तात्पर्य सांगण्याचा उपक्रम ज्यानें सुरूं केला त्यानें कथानिरूपणाच्या कलेची हानि तर केलीच, पण शिवाय असलीं तात्पर्यें वाचलीं कीं मुलें शहाणीं होतात अशा विपर्यस्त समजुतीचा प्रसार करण्याचें पापही त्यानें केलें. मानसशास्त्राची निर्दोष दृष्टि ठेवून बालशिक्षणाचें कार्य ज्याला करायचें असेल त्यानें हें सतत ध्यानांत वागविलें पाहिजे, कीं **लहान मुलांना शिकविण्यापेक्षां शिकूं द्यावें.** इतकेंच नव्हे, तर आपणही त्याच्याबरोबर शिकत आहोंत असें त्यांस वाटूं द्यावें. मोठीं माणसें लहान मुलांपुढें पुष्कळदां असा आव आणतात, कीं जणूं कांही आपण सर्वज्ञ आहोंत, व म्हणून आपली प्रत्येक आज्ञा मुलांनीं निमूटपणें पाळलीच पाहिजे. परंतु हें खोटें अवसान दीर्घकाल टिकण्यासारखें नसतें. मुलांनीं विचारलेले किती तरी प्रश्न या मोठ्या माणसांना उलगडून सागतां येत नाहींत. सारें जग देवानें बनविलें, पण देव कोणी बनविला? मूल आईच्या पोटांत असतें हें खरें का? आणि असेल तर तें कसें शक्य आहे? सूर्य सकाळींच का उगवतो? घार उंच उडते, मग कोंबडा कां उडत नाहीं?—असले प्रश्न विचारले कीं या मोठ्या माणसांजवळ रागें भरणें, चिडणें, आणि मारणें याखेरीज दुसरे उत्तरें नसतें हें लहान मुलांना समजून चुकतें. आणि मोठ्या माणसांची सर्वज्ञता अशा प्रकारें बेगडी ठरली, कीं त्यांच्या उपदेशांत आणि आज्ञांतही फारसें तथ्य मानण्याचें कारण नाहीं असें लहान मुलांस साहजिकपणेंच वाटूं लागतें.

म्हणून मोठ्या माणसांनीं लहान मुलांपुढें सर्वज्ञतेचा आव आणूं नये हें उत्तम. मुलांच्या कांहीं प्रश्नांचें समाधानकारक उत्तर देतां येत

नसल्यास त्यांस ' ही गोष्ट मला माहित नाहीं ' किंवा ' तुला समजेल अशा रीतीनें या गोष्टीचा खुलासा मला करतां येत नाहीं ' किंवा 'तुझ्या-प्रमाणेंच मलाही ही गोष्ट अजून शिकावयाची आहे ' असें प्रामाणिकपणें सरळ सांगावें. मोठीं माणसें अगर शिक्षक म्हणजे ज्यांची सर्वज्ञता गृहित धरली पाहिजे, ज्यांच्या आज्ञा समजल्या नाहींत तरी मानल्या पाहिजेत, ज्यांच्याशीं विशेष सलगी ठेवून उपयोग नाहीं, ज्यांच्याशीं सदा भिऊन, वचकून, मनांतले खरे संकल्प, विचार, आणि विकार लपवूनच वागलें पाहिजे अशा व्यक्ती होत अशी समजूत लहान मुलांच्या ठिकाणीं कधींही उत्पन्न होऊं देऊं नये. **आईबाप अथवा शिक्षक म्हणजे** ज्यांच्याशीं आपले सारे संकल्प मनमोकळेपणानें बोलतां येतील, जे आपल्याप्रमाणेंच भोंवतालच्या जगावर परोपरीचे प्रयोग करून पाहण्यास शिकत आहेत, जे आपल्या ठिकाणच्या कर्तृत्वाला आणि अभिमानाला योग्य तो मान द्यावयास सदैव तयार आहेत, आणि ज्यांच्याशीं आपल्या सुखदुःखाच्या साऱ्या गोष्टी उघड करण्याची आपण इच्छा धरावी— **असे आपल्या जिव्हाळ्याचे दोस्त होत असें लहान मुलांस वाटावयास लावणें हें बालसंगोपनाचें व शिक्षणाचें खरें मर्म होय.**

———

## प्रकरण ९ वें

बाल्यावस्थेंत मनोधर्म व मनोव्यापार कोणत्या स्वरूपाचे असतात व कोणत्या नियमानुसार चालतात हें आईबापांनीं आणि शिक्षकांनीं समजून घेतल्यास बालसंवर्धनाचें कार्य सुकर होईल, व संसारांतल्या मनस्तापाचें व चिंतेचें एक कारण बहुतांशीं नाहींसें होईल, हा मागील प्रकरणाचा निष्कर्ष होय. त्या प्रकरणांत एका विशिष्ट स्वरूपाच्या चवकशीला आपण प्रारंभ केला. आपण मनाशीं असें म्हटलें, कीं मानवी मनोव्यापारांविषयीं नव्या कसोटीनें निश्चित झालेले मुख्य मुख्य सिद्धांत आपल्याला कळले, तेव्हां आतां या सिद्धान्तांनुसार ज्या तऱ्हेचें आचरण खाजगी अगर सामुदायिक जीवनांत मनुष्यानें ठेवणें युक्त होईल तसेंच आपलें आचरण खरोखरच आहे कीं नाहीं तें पाहूं. तसें तें असेल तर उत्तमच झालें; नसेल तर मात्र आपली राहणी त्या सिद्धांताच्या विरुद्ध कोणकोणत्या बाबतींत आहे तें नीट ध्यानांत घेतलें पाहिजे. कारण, वैयक्तिक अगर सामाजिक व्यवहारांतल्या ज्या ज्या बाबतींत अज्ञानानें अगर हटवादानें आपण मानसशास्त्राशीं विरोध करीत असूं त्या त्या ठिकाणीं दुःखाचें उगमस्थान आहे असें मानावयास हरकत नाहीं. आपलें आयुष्य शक्य तितकें सुखाचें व्हावें असें कोणाला वाटत नाहीं ! संसारांत अनेक प्रसंगीं जें दुःख सोसावें लागतें त्याचा परिहार करतां आल्यास करावा अशी कोणाची इच्छा नसते ! ही इच्छा नुसती इच्छाच राहते येवढेंच वाईट आहे. आपण ती इच्छा सफल करून घेण्यासाठीं डोळसपणानें शोध व प्रयत्न केला पाहिजे. मानसशास्त्राचें अध्ययन करून आपल्या रोजच्या विविध व्यवहारांतील दोषस्थळें दुरुस्त करणें हेंच त्या प्रयत्नाचें खरें स्वरूप होय.

कारण, **संसार ही एक कला आहे. ती एक भयंकर आपत्ति आहे असें आपण इतके दिवस मानलें तें पुरें झालें. तसें मानण्याची कल्पना निघाली तीसुद्धां मानवी मनोव्यापारांबद्दल चुकीच्या**

कल्पना आपण उगीचच मान्य केल्या म्हणून. कलेपासून देखील आल्हादाऐवजीं कष्ट आणि त्रास उत्पन्न होण्याचा संभव असतो. पण तो केव्हां? आणि कोणाला? जेव्हां एखादा मनुष्य एखाद्या कलेच्या उपकरणांविषयीं आणि साधनांविषयीं योग्य ज्ञान करून न घेतां वेड्या समजुतीनें त्या कलेस हात घालतो त्या वेळेस त्या मनुष्याला आनंदाऐवजीं असमाधान आणि निराशा यांचीच प्राप्ती होते. एखाद्यानें मूर्खपणानें बाजाच्या पेटीचा भाता धसमुसळेपणानें खेंचून बोटाच्या तडाख्यांत सांपडतील त्या पट्या ओरबाडल्या तर मधुर संगीताऐवजीं कर्णकठोर, कर्कश आवाज निर्माण व्हावा हें क्रमप्राप्तच होय, आणि तसें झाल्यावर संगीत म्हणजे एक मोठी आपत्ती आहे असें त्या मूर्ख माणसाला वाटावें हेंही क्रमप्राप्तच होय. परंतु, असें झालें म्हणून संगीत कर्णकर्कश ठरत नाहीं. मानवी जीवनाचेंही असेंच आहे. त्या जीवनाचीं कांहीं विशिष्ट साधनें आणि उपकरणें निसर्गानें ठरविलीं आहेत. त्यांपैकीं मानवी देह आणि मानवी मन हीं मुख्य होत. या दोहोंबद्दलच्या मनाशीं विपरीत कल्पना धरून आपण वागूं लागलों तर सुखाऐवजीं दुःख वांट्याला यावें यांत आश्चर्य नाहीं; आणि मग संसारांत अणुमात्र सुख नाहीं अशी आपली कल्पना व्हावी यांतही आश्चर्य नाहीं.

मनोव्यापारांचें शास्त्रशुद्ध ज्ञान करून घेतलें आणि त्या ज्ञानानुसार आपला सर्व व्यवहार आपण ठेवूं लागलों तर मात्र या सर्व कल्पना लयास गेल्यावांचून राहणार नाहींत. मग संसारांत अनेकविध व्यवहारांचें तापदायक स्वरूप नाहींसें होऊन त्यांतून सुखसमाधानाची निष्पत्ति व्हावयास लागेल. या दृष्टीनें बालशिक्षण व बालसंवर्धनाचा विचार आपण मागच्या प्रकरणांत केला. आतां ती दृष्टि कायम ठेवून आपल्या रूढ व्यवहाराच्या आणखी कांहीं भागांचा विचार करतां आल्यास पाहूं.

या विचारांस साहाय्यक होणारी एक उपपत्ति मी आपल्या मनानें बसविली आहे ती येथें सांगतों. ती अशी, कीं कोणत्याही समाजांत प्रचलित असणारी बालसंवर्धनाची पद्धति आणि एकंदर समाजास

बंधनकारक मानले गेलेले धर्मनीतींचे नियम आणि विधिनिषेध यांत फार निकट संबंध असतो. लहान मुलांस धाक दपटशा दाखवून, त्यांजवर करडा दरारा ठेवून आणि त्यांस उठतां बसतां शासनाची दहशत घालून त्यांजकडून विद्या करून घ्यावी, आणि त्यांच्या अंगीं सद्गुणांचें बीजारोपण करावें अशी समजूत ज्या समाजांत प्रचलित असते, त्या समाजांतील एकंदर आचार-विचारांची आणि व्यवहाराचीहि उभारणी धाकदपटशा, आणि दहशत या तत्त्वावरच झालेली असणार असें आपण खुशाल मानावें. उलट, ज्या समाजांत मुलांच्या स्वतंत्र वृत्तीस व कर्तृत्वबुद्धीस शक्य तितका वाव देऊन त्यांस शिकवावें आणि शिस्त लावावी अशा मताचा पुरस्कार होत असेल, त्या समाजांत मोठीं माणसेंहि विधिनिषेधांच्या कचाट्यात, आणि पापपुण्याच्या हिशोबांतच गुदमरून न जातां पुष्कळशा मोकळेपणानें आपले नित्यनैमित्तिक व्यवहार पार पाडीत असतील अशी कल्पना करावयास कांहीं हरकत नाहीं.

हे तर्क सहसा चुकायचे नाहींत. कारण असें, कीं कोणत्याही समाजांत आचारशास्त्र म्हणून ज्या विधिनिषेधांचा प्रचार चालू असतो ते विधिनिषेध कोणा तरी शास्त्रकारांनीं एकदां केव्हां तरी घालून दिलेले असतात. ते शास्त्रकार म्हणजे त्या काळांतील शहाणे व समंजस पुढारी होत. त्या विशिष्ट काळांतील परिस्थिति नीट लक्षांत घेऊन आपला समाज कोणत्या शिस्तीनें वागला तर त्याचें संख्याबल, आणि त्याची एकी वाढेल याचा ते विचार करतात, व जे विधिनिषेध त्यांना आवश्यक व हितकारक वाटतात त्यांची घोषणा त्यांजकडून होते. हा विचार व त्यामुळें सुचणारे विधिनिषेध कायम करतांना हे शास्त्रकार मनाशीं म्हणतात, 'समाजांतले हे सारे स्त्रीपुरुष लहान, अजाण, खोडकर मुलांसारखे आहेत. त्यांची बुद्धि अपरिपक्व आहे, त्यांना मागचा पुढचा पोंच नाहीं, त्यांना तारतम्य कसें करावें कळत नाहीं, या मानवी जीवितांत साध्य कोणतें आणि तें कसें प्राप्त करून घ्यावयाचें याचा विवेक त्यांना करतां येत नाहीं ! तेव्हां लहान मुलांची आणि यांची अवस्था सारखीच ! आणि लहान मुलांस नीट मार्गावर आणण्याचें काम आणि

वयानें मोठ्या पण बुद्धीनें पोरसवदाच असलेल्या या स्त्रीपुरुषांस इकडे तिकडे झुकूं न देतां समाजहिताच्या राजरस्त्यानेंच चालवयास लावण्याचें काम—दोन्ही सारखींच !"

याचा अर्थ असा, कीं कोणत्याही समाजांत सामान्यपणें जे विधि-निषेध प्रचारांत असतात त्यांच्या बुडाशीं शास्त्रकारांनीं गृहीत धरलेली शिक्षणविषयक कल्पना असते. समाजांतल्या स्त्रीपुरुषांच्या मनोधर्माविषयीं कांहीं तरी एक विवक्षित समजूत शास्त्रकार मनाशीं गृहीत धरतात, त्या स्त्रीपुरुषांस अमूक एका विवक्षित आचारास प्रवृत्त करण्याची सर्वोत्तम साधनें कोणतीं याबद्दलही ते आपल्या मतानें एखादी उपपत्ति बसवितात, आणि मग 'शास्त्र' सांगतात. आपल्या समाजांत आजपर्यंत चालत आलेल्या बालसंवर्धन पद्धतीच्या मुळाशीं ज्याप्रमाणें चुकीचें मानस-शास्त्र आहे, त्याचप्रमाणें आपल्या बाकीच्या खाजगी व सामुदायिक व्यवहारावर ज्या विधिनिषेधांचें नियंत्रण आपण मानीत आलों तेही चुकीच्या मानसशास्त्रावर आधारलेले आहेत. आपण आपल्या घरांत, चार मित्रमंडळींत मिसळल्यावर, आणि नाना प्रकारच्या सार्वजनिक प्रसंगीं कसे वागतों, कोणते विधिनिषेध पाळण्याची दक्षता घेतों, व ती कां घेतों याविषयीं थोडी सूक्ष्म दृष्टि ठेवून आपण विचार केला तर आपल्याला काय दिसेल बरें ? मानवी मनोव्यापाराच्या यथार्थ ज्ञानाचा भक्कम पाया आपल्या रोजच्या व्यवहाराला असतो असें आपल्याला म्हणतां येईल काय ? उलट, मुलांना वागविण्याची, वाढविण्याची आणि शिकविण्याची आपली पद्धति ज्याप्रमाणें मानसशास्त्रदृष्ट्या चुकलेली आहे त्याचप्रमाणें आपल्या समाजांतल्या स्त्रीपुरुषांचे बहुतेक व्यवहारही भल-त्याच तत्त्वावर आधारलेले आहेत असें म्हणणें भाग पडणार नाहीं काय ?

बालशिक्षणाविषयीं मागच्या प्रकरणांत लिहितांना मानस-शास्त्रानुसार जीं तत्त्वें त्या शिक्षणांत अंतर्भूत झालीं पाहिजेत म्हणून प्रतिपादिलें तीं हीं:—

१. मुलांच्या ठिकाणचा हट्ट किंवा आग्रह हें एक जिवंत-पणाचें लक्षण आहे असें समजावें.

२. आपल्या कर्तृत्वानें आपण नव्या नव्या गोष्टी शिकत आहोंत असें मुलांना वाटूं द्यावें.

३. मुलांच्या आंगच्या कांहीं प्रवृत्ति अनिष्ट व चमत्कारिक वाटल्या तरी त्यांबद्दल त्यांस अपराधी समजूं नये.

४. भय आणि जबरदस्ती या साधनांनीं मुलांचें खरें शिक्षण व कल्याण कधीं होत नसतें.

५. मुलांना शिस्त लावावी, पण ती दंडुकेशाहीनें नव्हे तर त्या शिस्तीबद्दल त्यांच्या ठिकाणीं आवड उत्पन्न करून.

६. शिक्षणाचें खरें ध्येय एकच—त्यामुळें मन स्वतंत्र आणि धीट झालें पाहिजे.

मला असें वाटतें, कीं हीं तत्त्वें बालसंवर्धनापुरतींच उपयुक्त आहेत असें नव्हे, तर एकंदर साऱ्या सामाजिक व्यवहारांचें स्वरूप ठरवितांना देखील या तत्वांचा फार उपयोग होईल. पूर्वीच्या शास्त्रकारांनीं समाजांतल्या बहुसंख्याक सामान्य स्त्री-पुरुषास लहान मुलासारखें लेखिलें ह्यांत त्यांची चूक झाली नाहीं. समाजांतल्या बहुसंख्याक लोकांना असें लेखणेंच आवश्यक असतें. मानवी संस्कृति जसजशी पुढें जात आहे, तसतशी नव्या नव्या यंत्राच्या आणि सुखसाधनांच्या शोधांमुळें आणि प्राथमिक शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळें समाजांतल्या प्रत्येक घटकाची बुद्धि अधिकाधिक प्रगल्भ होत आहे यांत संशय नाहीं. चार हजार वर्षांपूर्वीचा सामान्य नागरिक आणि आजचा सामान्य नागरिक यांची तुलना केल्यास आजचा माणूस निःसंशय अधिक बुद्धिमान आणि बहुश्रुत ठरेल. परंतु समाजांतला सामान्य मनुष्य आणि शहाणा पुढारी यांत जें कांहीं अंतर पूर्वीं असेल तेंच आजही कायम आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तेव्हां समाजांतल्या स्त्रीपुरुषाच्या व्यवहारासाठीं नियम घालून द्यावयाचे झाल्यास आजचा शहाणा पुढारी अगर 'शास्त्रकार' ही ते स्त्रीपुरुष आपल्यापेक्षां किती तरी पटीनें अजाण आहेत असेंच गानील. सामान्य स्त्रीपुरुषांस लहान मुलांप्रमाणें मानण्यांत पूर्वीच्या शास्त्रकारांनीं योग्य तेंच केलें. त्यांचें चुकलें तें अजाण माणसांना सुजाण करण्याची

**जी पद्धति त्यांनीं मनाशीं ठरविली त्या पद्धतींत!** दहशत घातल्यानें लहान मूल गप्प राहतें, हट्ट सोडतें, आणि शिकवावें तें शिकतें, हें जसें त्यांना खरें वाटलें तसेंच समाजांतल्या स्त्रीपुरुषांना सदाचारास उद्युक्त करावयाचें असेल, आणि अनाचारापासून दूर ठेवावयाचें असेल तर, त्यांस वाटलें, त्याला उपाय एकच! त्यांना सतत कसली तरी दहशत घातली पाहिजे!

याचा परिणाम असा झाला कीं, **आपल्या समाजांतल्या स्त्रीपुरुषांच्या व्यवहारास चालना देणारी 'भीति' ही एकच शक्ति होऊन बसली आहे.** धर्म, नीति, लोकमत इत्यादि संस्थांचें स्वरूपच असें होत गेलें, कीं जणूं समाजांतल्या माणसांना त्याची दहशत वाटावी येवढाच हेतु त्यांच्या बुडाशीं आहे. ईश्वर मानायचा पण तो मुख्यतः कशासाठीं? तर त्याच्या अवकृपेचें भय वाटावें म्हणून! धर्मगुरु आणि उपाध्याय यांना समाजांत स्थान द्यावयाचें; पण तें मुख्यत्वेंकरून कशासाठीं? तर समजांतले जे स्त्रीपुरुष शास्त्राचें उल्लंघन करतील त्यांस प्रायश्चित्त सांगण्यासाठीं आणि शासन करण्यासाठीं! **बाबा रागावतील अशी सारखी दहशत वाटून लहान मुलानें अभ्यास करावा त्याप्रमाणें ईश्वराची धर्मगुरूंची आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या अपवादाची सारखी दहशत बाळगून आम्ही ठरीव विधिनिषेधांचें पालन करीत आलों आहोंत.** ते विधिनिषेध आमच्या तर्कबुद्धीस पटत आहेत असें नाहीं. त्यापासून पूर्वी कधीं काळीं जसें एकंदर समाजाचें थोडें बहुत कल्याण झालें असेल तसें आज होत आहे असा आम्हांला प्रत्यय येत नाहीं! पण असें असूनही त्यांचें परिपालन केलेंच पाहिजे असें आम्हांस वाटतें. कारण तें न केल्यास कोठली तरी एक जबरदस्त दैवी अगर मानवी शक्ति आमच्यावर कोप करील ही भीति आम्हांला सोडीत नाहीं. समाजांतल्या प्रत्येक व्यक्तीच्या मनावर भयाच्या भावनेचा जबरदस्त पगडा लहानपणापासून बसावा अशीच आमच्या समाजाची घटना आज शेंकडों, हजारों वर्षांपासून होत आली आहे.

भयाच्या दडपणानें जे सदाचार स्त्रीपुरुषांच्या हातून घडतात त्यांची तत्त्वतः किंमत कितीशी मानायची हा प्रश्न तर निराळाच; पण

त्या खोल प्रश्नांत शिरलें नाहीं, आणि त्या सदाचारांची बरीच किंमत मानतां येईल असें जरी गृहीत धरलें, तरी दुसरा एक फार मोठा प्रश्न शिल्लक राहतोच. तो प्रश्न असा, कीं दहशत मानून ठराविक सदाचारांच्या चाकोरींतून जाणाऱ्या व्यक्तींच्या मनोधर्मावर, महत्त्वाकांक्षेवर, कर्तृत्वावर, आणि एकंदर कायिक व मानसिक विकारांवर त्या सदाचाराचा जो परिणाम होतो–आणि जो निसर्गनियमानुसार झालाच पाहिजे–तो इष्ट आहे की अनिष्ट आहे ? लहान मूल बापाच्या धाकानें शाळेंत गेलें म्हणजे त्याच्या त्या शाळेंत जाण्यानें त्याचें कल्याण झालें असें मानणें कितपत सयुक्तिक होईल ? तशा त्या शाळेंत जाण्यानें त्या मुलाचें खरें चित्त अभ्यासाऐवजीं त्याच्या आवडीच्या चाळ्यांकडेच राहील. सक्तीने शाळेंत जावें लागल्यामुळें तो मुलगा आपल्या मनाशीं कुरठेल, इतकेंच नव्हे, तर शाळेंतल्या शिक्षकांचा आणि अभ्यासाबद्दल सक्ति करणाऱ्या आईबापाचा तें मूल द्वेषही करूं लागेल, हें खरें पाहतां उघड नाहीं काय ? हाच न्याय मोठ्या माणसाच्या हातून धाकदपटशा दाखवून सदाचार करवून घेण्याच्या प्रकारासही लागूं आहे. या प्रकारात मानसशास्त्राविषयींचें गाढ अज्ञान भरलेलें आहे. हा प्रकार चालूं देणे म्हणजे समाजांतल्या प्रत्येक माणसाला आपल्या मनाशीं म्हणजे आपल्या नानाविध नैसर्गिक प्रवृत्तींशीं आणि प्रेरणाशीं सतत झुंजावयास लावण्यासारखे आहे !

असली झुंज आपण आजपर्यंत चालूं दिली म्हणून आपल्या समाजातला जो तो माणूस शिणलेला आणि भागलेला दिसत आहे. सामाजिक व्यवहाराचा ज्या त्या बाबतीत लोकाना त्रास होत आहे. **प्रत्येक मनुष्य नाना प्रकारच्या भयांनीं घाबरून गेल्यासारखा वाटत आहे ! प्रत्येकाला ईश्वराचें भय आहे, धर्माचें भय आहे ! स्त्रियांना पुरुषांचें आणि पुरुषांना स्त्रियांचें भय वाटत आहे ! इतकेंच नव्हे तर प्रत्येक माणसाला स्वतःचेंच मनस्वी भय वाटत आहे.**

हो. स्वतःचेंसुद्धां ! समाजांतल्या स्त्रीपुरुषांकडे शोधक दृष्टीनें जो पाहील त्याला हें सहज पटेल. प्रत्येक पुरुष स्वतःच्या अनेकविध प्रेरणांना सारखा भीत असतो ! प्रत्येक स्त्रीलाहि पुनःपुन्हां आपल्या

अंतःकरणांतील कित्येक प्रेरणांची भीति आणि किळस वाटत असते. मानसशास्त्राच्या नियमांकडे पाहिल्यास हा परिणाम क्रमप्राप्त आणि अपरिहार्य आहे असें म्हणावें लागतें. लहान मुलांचेंच उदाहरण घेऊं, म्हणजे मी म्हणतों त्याबद्दल शंका उरणार नाहीं. सतत अभ्यासाकडे चित्त ठेवावें, दांडगाई करूं नये, आईबापांस व वडीलधाऱ्या माणसांस उलट उत्तर करूं नये, इत्यादि बोधवचनांची अव्याहत घोपणा कानीं कपाळीं पडल्यामुळें, या नियमांविरुद्ध वर्तन घडल्याबरोबर शासन अगर निर्भर्त्सना तरी होत गेल्यामुळें, आणि त्या नियमांचा भंग घडेल अशा प्रेरणा मात्र सारख्या अनुभवास येत गेल्यामुळें लहान मुलांस साहजीकपणेंच अखेर स्वतःचा तिटकारा आणि भय वाटूं लागतें. आपल्या व्यतिरिक्त इतर लहान मुलांच्या ठिकाणींही नकोत त्या प्रेरणा उद्भवत असतात, हें त्याला कळत नाहीं. त्यामुळें तें लहान मूल आपल्या मनाशीं म्हणूं लागतें, 'अरेरे! ज्या प्रेरणांमुळें आणि प्रवृत्तींमुळें निषिद्ध असें वर्तन माझ्या हातून घडतें, मला बोलणीं खावीं लागतात व त्याहूनही असह्य असें शासन सोसावें लागतें, त्या प्रवृत्ती माझ्या ठिकाणीं कितीही दाबल्या तरी उसळतात. त्या अर्थी माझा स्वभावच मोठा भयंकर व गलिच्छ असला पाहिजे!'

असें त्या मुलाच्या मनांत पुनःपुन्हा आलें म्हणजे एखाद्या शारीरिक व्यंगाची लाज वाटावी तद्वत् त्याला आपल्या मनोविकारांची व संकल्पांची लज्जा वाटूं लागते. ते उद्भवूं न देणें तर त्याला साधण्यासारखें नसतें. लोकांपासून ते लपविणें शक्य असतें, व तें तो करतो. पण हा लपंडाव त्यानें कितीही बेमालूम केला तरी अंदरकी बात त्याची त्याला माहीत असते व त्याबद्दलची शरम त्याला आंतून सतत खात असते. आणि त्यामुळें शरीरानें अधू अगर अपंग असणारें मूल जसें मनाशीं स्वतःला दुर्दैवी आणि दुर्बल समजून चालत असतें त्याप्रमाणें तो स्वतःला कमनशिबी व इतर सर्वांहून कनिष्ठ योग्यतेचा मानावयास लागतो. या शरमेप्रमाणेंच भीतीचीहि बाधा त्याला झाल्यावांचून रहात नाहीं! आपल्या मनांत नको ती प्रेरणा केव्हां उद्‌भवेल त्याचा नियम

नाहीं अशी त्याला धास्ती वाटत असते. ज्या चाकोरींतून आईबाप व शिक्षक त्याला जावयास सांगत असतात, त्यापलीकडच्या एखाद्या विषया-बद्दल संकल्पाची उगीच सूक्ष्म हालचाल झाली तरी त्याच्या छातींत धस्स होतें. त्याला वाटतें, 'अरे बापरे! उठला माझ्या स्वभावांतला हा सैतान! याच्याशीं मला आतां झटापट करणें भाग आहे!'

सारांश, मुलांच्या मनोधर्मोशीं विसंगत अशा कल्पनांवर आधार-लेल्या संवर्धनपद्धतीची शिस्त मुलांवर लादली, कीं शरम आणि भीति त्यांचें अंतःकरण पोखरून टाकतात व त्यांच्या ठिकाणचा धीटपणा व आत्मविश्वास कायमचा ढांसळतो. आणि आपल्या समाजांतल्या लहान बालकाचीच अशी दुर्दशा होत गेली आहे असें नव्हे, तर मोठ्या माणसाचीहि तीच केविलवाणी अवस्था असल्याचें आढळून येतें! हें कोणाला खरें वाटत नसेल तर आपल्या समाजांत प्रसृत झालेल्या ईश्वरविषयक आणि धर्मविषयक कल्पनापैकीं काहीं कल्पना त्यानें जरा छानून पहाव्या.

ईश्वरावरच्या निष्ठेचा मोठा भाग म्हणजे माणसानें स्वतःकडे अधम पाप्याची भूमिका घेऊन ईश्वराला शरण जावयाचें याच प्रकाराचा समजला जातो. ईश्वरापुढें आपल्या सत्कृत्यांचा व पराक्रमाचा उल्हासानें उच्चार करावा असें कधीं कोणी सांगितलें आहे? छे! ईश्वराची कल्पना अशासाठीं नाहींच मुळीं! ईश्वर अशासाठीं मानायचा कीं, त्याच्यापुढें उभें राहून प्रत्येक स्त्रीपुरुषानें म्हणावयास शिकावें, 'हे देवाधिदेवा, मी दीन, दुराचारी आहे! मी पापी आहे, वासनाची ओंगळ घाण माझ्या जीविताला येत आहे! मी अंतर्बाह्य पतित आहें! तेव्हां तुझ्यावाचून माझा कोण उद्धार करणार?'

नीतिशास्त्राचीसुद्धां आम्हांला मुख्य शिकवण कोणती?—तर बघा, सावध रहा! तुमच्या ठिकाणीं काम, क्रोध इत्यादि भयंकर षड्रिपु वास करीत आहेत! त्यांच्या प्रेरणांना बळी पडलांत कीं तुमचा सत्यनाश झालाच म्हणून समजा! तुमचे इहलोकींचें कर्तव्य असें, कीं एखाद्या दारूगोळ्याच्या कोठाराप्रमाणें या कामक्रोधादि विकारांपासून

व्यवहार सुरक्षित ठेवायचा! मरणानंतर परलोकांत यमधर्माच्या हातून सदाचाराबद्दल सुवर्णपदक मिळवायचें असलें तर या इहलोकच्या यात्रेंत सारे षड्विकार पार उन्मळून टाकण्याची तपश्चर्या केली पाहिजे! हे विकार आपल्याला सारखे पापाला प्रवृत्त करीत असतात. इतकेच नव्हे, तर आपल्या सावधगिरीचा काच जरा ढिला झाला, कीं आपल्याला नकळत ते पापाची घाण आपल्या दारीं आणून टाकायला कमी करायचे नाहींत! त्यामुळें आमच्या प्रत्येक धर्मकृत्याला प्रारंभ प्रायश्चित्तापासून होत असतो. ऋतुशांति असो, नाहीं तर पितृपूजन असो, 'ज्ञाताज्ञात-सकलदोषपरिहारार्थम्' हा मंत्र आम्हांला म्हटलाच पाहिजे. शांति व प्रायश्चित्त यांनींच आमच्या धर्मविधींचा बहुतेक भाग व्यापलेला आहे.

आणि आम्हां हिंदूंच्याच ईश्वरनिष्ठेचें व धर्माचारांचें असें आहे असें नव्हे. सगळीकडेच असें आहे. ईश्वर, धर्म, नीति या गोष्टींस संस्थांचे स्वरूप आलें, कीं त्यांचे हे दुष्परिणाम ठरलेले आहेत. इंग्रजींत सदाचारसंपन्न मनुष्याला God-fearing (ईश्वराला भिणारा) अशी संज्ञा देण्याची रीत आहे. समाजांतलीं माणसें नेहमीं नम्र राहिलीं पाहिजेत अशी ईश्वराची व धर्माच्या मिरासदारांची इच्छा असते. म्हणून ते अशी शिकवणूक पसरवीत राहतात, कीं माणसाच्या ठिकाणीं असत्प्रवृत्तींचें जंजाल माजलेलें आहे, त्याच्या हातून सतत पापें घडत आहेत, त्यानें ईश्वरापुढें आणि ईश्वराच्या उपाध्यायापुढें भयानें मस्तक खालीं घालून, शरमेनें आणि नम्रतेनें उभे रहावें व त्यांच्या आज्ञा मुकाट्यानें परिपाळाव्या हेंच उत्तम!

सारांश, मुलांना वाढविण्याची व शिकविण्याची आपली पद्धति जशी चुकत आली, तशीच मोठ्या माणसांनीं आपले विविध सांसारिक व्यवहार ज्या शास्त्रानुसार आणि नीतिनियमानुसार करावेत अशी आपली समजूत व श्रद्धा होत आली तें शास्त्र व नियमही विपरीत मानसशास्त्रावर आधारलेले आहेत. समाजांतल्या बहुसंख्याक स्त्रीपुरुषांस एक प्रकारें लहानाचीं मोठीं, अजाणाचीं सुजाण करण्याचें कार्य समाजाच्या पुढा-

न्यास—म्हणजे शास्त्रकारांस—करावयाचें असतें. परंतु म्हणूनच मानस-शास्त्राच्या दृष्टीनें पायाशुद्ध शिक्षण असेल अशी खबरदारी लहान मुलांच्या बाबतींत जशी त्यांनीं घेतली पाहिजे, तशीच मोठया माणसांच्या अनेकविध व्यवहारांत शिस्त लावून देतांना त्यांच्या नैसर्गिक मनोधर्मांची उगीचच्या उगीच गळेचेपी न होईल, व त्यांस व्यर्थ भय, आणि दह-शत वाटणार नाहीं अशी काळजी घेणेंही आवश्यक आहे. आपल्या समाजाच्या व्यवहारांकडे पाहिलें, तर याच्या अगदीं उलट स्थिति असल्याचें आढळून येतें. साऱ्या माणसांना आपल्या स्वाभाविक प्रेरणांचें व मनोधर्मांचें भय वाटत आहे. या भय दाखविणाऱ्या गोष्टींत दोन अगदीं मुख्य. ईश्वर आणि प्रणय. सगळयांच्या मनांवर पक्कें बिंबवलें गेलें आहे, कीं ईश्वराला भिऊन पापापासून दूर राहिलें पाहिजे; आणि पापाची मोठ्यांतली मोठी खाण कोणती असेल तर स्त्रीपुरुषांस परस्परां-विषयीं वाटणारा ओढा ! ' विषय ' किती घातकी आहे त्याच्या वर्ण-नांनीं आमच्या वाङ्मयाचीं किती पानें भरलीं असतील, व किती कथा पुराणें रंगलीं असतील त्याला गणतीच नाहीं !

परंतु ' विषय ' खरोखरच इतका भयंकर आहे कां, कीं त्या-पासून स्त्रीपुरुषांचें रक्षण व्हावें एतदर्थ त्यांस पदोपदीं विधिनिषेधांच्या लगामांनीं खेचणें आवश्यक आहे? **स्त्रीला पुरुषाची सतत धास्ती वाटावी, व पुरुषास स्त्रीविषयक कल्पना पापासारख्या वाटाव्या अशी सामाजिक व्यवहारांची घडी बसवून देण्यांत मानवी स्वभा-वाशीं आपण निरर्थक झुंज तर करीत बसलों नाहीं?** हें आपलें भयग्रस्त नीतिशास्त्र सर्वस्वीं अनैसर्गिक व अनिष्टपरिणामी तर नाहीं? आपल्या अंगीकृत विषयाच्या दृष्टीनें हे प्रश्न इतके महत्त्वाचे आहेत, कीं त्यांची चर्चा पुढील प्रकरणात स्वतंत्रपणें करणें उचित होईल.

---

# प्रकरण १० वें

विषयवासना ही एक भयंकर घातकी वासना आहे, ज्याला पुण्यसंचय करायचा आहे त्यानें तिची दहशतच नेहमीं बाळगली पाहिजे व स्त्रियांनीं पुरुषांस व पुरुषांनीं स्त्रियांस पापाचा मोह पाडणाऱ्या वस्तू असें समजून परस्परांचा विटाळच नेहमीं मानला पाहिजे ही शिकवणूक आजपर्यंत आपण उराशीं धरली खरी; पण आतां खचित अशी वेळ आली आहे, कीं या शिकवणुकीचा खरेखोटेपणा तपासणें आवश्यक आहे. आपल्या सामाजिक जीवनाचें नियमन करणारे एकंदर विधि-निषेधच मानसशास्त्रदृष्ट्या कसे चुकीचे आहेत तें मागील प्रकरणात सांगितलेंच आहे; आणि विषयवासना अतिनिषिद्ध मानण्याचा सिद्धात त्या विधिनिषेधांवरूनच प्राप्त होत असल्यामुळें त्या सिद्धांताची छाननी कोणत्या धोरणानें करता येईल हें वास्तविक मागच्या प्रकरणांतील चर्चे-वरून स्थूलमानानें समजण्यासारखें आहे. परंतु ' काम 'प्रेरणेच्या या विषयाचें महत्व इतकें मोठें आहे, कीं त्याचें विवेचन येवढ्यावरच सोडणें उचित नाहीं. म्हणून प्रस्तुत ग्रंथाची मर्यादा साभाळून त्याची शक्य तितकी सविस्तर चर्चा करण्याचें मी योजिलें आहे.

मला वाटतें नीतिनियम घालून देणारे शास्त्रकार पुष्कळदां स्वतःचा असा समज करून घेतात, कीं ज्या ज्या प्रेरणेच्या पूर्ततेपासून मनुष्यास विलक्षण सुखाचा अनुभव येतो ती ती निषिद्ध मानली पाहिजे. ते मनाशीं म्हणतात, नीतीनें वागावयाचें तर सुखाच्या अपेक्षेनें नव्हे तर कर्तव्याच्या रूक्ष जाणिवेनें; तेव्हां नीतीनें वागणारा इसम जर सुखासाठीं तसा वागत नाहीं तर तो कधीं सुखी असणें शक्य नाहीं; अर्थात् नैतिक आचरण आणि आनंद यांचा समन्वय कधींही होणें शक्य नाहीं; आणि ज्या ज्या प्रेरणेमुळें मनुष्यास कमी अधिक सुख होतें तिच्यावर तितक्या प्रमाणांत निषेधाचा शिक्का मारला पाहिजे.

अशा गैरसमजांतूनच आमचें आचारशास्त्र बहुतांशीं उद्भवलें आहे. विषयवासनेचा धिःकार होत आला आहे तोहि या गैरसमजामुळेंच.

कारण, वास्तविक पहातां स्त्रीपुरुषांस परस्परांविषयीं वाटणारें आकर्षण म्हणजे वैयक्तिक जीवनाला चालना देणारी सर्वांत अधिक प्रभावी शक्ति आहे. तिच्या सामर्थ्यानें गांगरून आणि भिऊन जाण्यांत कोणता शहाणपणा आहे? त्यापेक्षा निसर्गांतल्या अनेक शक्तींचें सत्य स्वरूप समजून घेऊन ज्याप्रमाणें त्यांची योजना आपण आपल्या जीवितसुखासाठीं करीत आहोंत, त्याचप्रमाणें याही शक्तीचें खरें स्वरूप ओळखण्यास शिकून तिच्या सहाय्यानें आपला संसार बहुविध आणि रमणीय करतां येत असेल तर करणें अधिक सूज्ञपणाचें नाहीं काय?

पहिली गोष्ट ही, कीं **स्त्रीपुरुषांस परस्परांबद्दल वाटणारें आकर्षण म्हणजे केवळ एक पशुकोटीची प्रेरणा होय असें समजणें चुकीचें होय.** कारण, वास्तविक पाहतां या आकर्षणाचें स्वरूप मनुष्य व पशु यांतील साम्य दर्शविणारें नसून पशूहून मनुष्य श्रेष्ठ आहे हें दर्शविणारे आहे. पशूंच्या लिंगविषयक प्रवृत्तींहून मानवी लिंगविषयक व्यवहार किती तरी भिन्न व श्रेष्ठ प्रतीचे आहेत! श्वसनशक्ति पाहिली तर तींत मनुष्यापेक्षां पक्षी अधिक बलवान आहेत! गति पाहिली तर तींत मनुष्याहून शतपटींनीं अधिक वेगवान अनेक प्राणी आहेत! मनुष्याहून अधिक तीक्ष्ण डोळे, नाक, अगर कान अनेक पक्षुपक्ष्यांच्या ठिकाणीं दिसून येतात. 'काम'प्रेरणेच्या बाबतींत मात्र मनुष्याची कोटी पशुपक्ष्यांपेक्षा अतिशय वरची आहे. कारण, ही मानवी प्रेरणा अत्यंत जागृत व संस्कारसिद्ध असून मानवी व्यापारांच्या व मनोभावनांच्या सर्व क्षेत्रांत तिचे परिणाम फार दूरवर होत असल्याचें दिसून येतें. हेव्हलॉक एलिस या जगविख्यात पंडितानें असे उद्‌गार एके ठिकाणीं काढले आहेत, कीं 'मनुष्याच्या स्वभावांत जो पाशवी स्वभावाचा अंश आहे त्यांत कामप्रवृत्तीचा अंतर्भाव करणें निखालस चूक आहे; उलट **मानवी चरित्रास सौंदर्य आणि दिव्यत्व आणणाऱ्या ज्या ज्या गोष्टी आहेत त्यांचा उगम या 'काम'प्रवृत्तीच्या हालचालींत आहे हें सिद्ध करतां येईल!'**

पण वासनांचा व प्रेरणांचा उच्छेद करण्याचें तत्वज्ञान समाजरचनेस लागू करणाऱ्या शास्त्रकारांनीं या सत्याकडे दुर्लक्ष केलें; व

'काम'प्रेरणा ही ज्या अर्थी अत्यंत प्रबल आहे त्या अर्थी ती सर्वांत अधिक पापमय होय असें कल्पून त्यांनीं समाजास तिची विलक्षण दहशत घालून ठेविली. स्त्रीपुरुषांच्या परस्पर आकर्षणास अभद्र व अमंगल मानण्याची आमची रूढी पाहिली, कीं पुष्कळदां असें विचारावेसें वाटते, कीं 'अहो, काम हा षड्रिपूंपैकीं एक होय हें कबूल. पण आपल्या समाजाच्या नित्यनैमितिक व्यवहारांत बाकीच्या सर्व रिपूंचा संचार अप्रतिबद्धपणें चाललेला असतांना या रिपूचीच तुम्हांला एवढी दहशत कां कीं त्याचा कोणी उघड उच्चार केल्याबरोबर तुम्ही 'शातं पापम्' म्हणून स्नान करायला निघतां ?'

कामप्रेरणा आणि द्रव्याचा लोभ या दोहोंचाहि वर्ग एकच ना ? दोन्ही षड्रिपूंपैकींच ना ? मग द्रव्यलोभ समाजांत अगदीं उजळ माथ्यानें कां वावरावा, आणि 'काम'प्रेरणा तेवढी लज्जास्पद आणि अप्रदर्शनीय कां मानली जावी ? तसेंच म्हटलें तर पैशाच्या लोभामुळें मनुष्याच्या हातून किती भयंकर कृष्णकृत्यें घडतात व समाजांत व राज्यात केवढाल्या क्रांती घडून येतात त्याला कांहीं सीमा ? पण ही गोष्ट स्पष्ट असूनही तुम्ही आम्ही उघड उघड पैशाची देवघेव करूं शकतों, पैशाची हांव बाळगूं शकतों व ती असावी असें एकमेकाला शिकवूं शकतों ! इतकें कशाला ? 'बाबा, ईश्वरप्राप्ति हवी असेल तर पैशाच्या मोहांत गुंतूं नकोस' असें उच्च रवानें सांगणारा कीर्तनकार देखील आधीं बिदागी ठरवल्याशिवाय हरिकीर्तनाला उभा रहात नाहीं ! आणि त्यांत कांहीं दूषणीय आहे असेंही कोणी समजत नाहीं !

म्हणजे 'लोभ' जरी षड्रिपूंपैकीं एक असला तरी मानवी व्यवहारांत त्याचें स्थान मान्य केलें गेलें आहे, व त्याचा अंमल मान्य करूनच आपण आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाचा गाडा चाल-वीत आहोंत. मग 'काम' या प्रेरणेचाहि असाच विचार करणें अवश्यक व इष्ट नाहीं काय ?

दुसरें एक उदाहरण घेऊं.

शास्त्रज्ञांचें असें मत आहे, कीं सर्व मानवी व्यवहाराच्या बुडाशीं मुख्यतः दोन क्षुधा आहेत. एक मिथुनक्षुधा, आणि दुसरी अन्नक्षुधा. या दोन क्षुधा नाहींशा झाल्या तर मनुष्य सर्वस्वीं निरिच्छ आणि निष्क्रिय झाल्यावांचून रहायचा नाहीं. या वासना आहेत म्हणूनच प्रत्येक स्त्रीपुरुष अहोरात्र धडपडत आहे. या वासना आहेत म्हणूनच परोपरीचे मानवी उद्योग सुरू आहेत. या वासना आहेत म्हणूनच मनुष्याच्या हातून भयंकर गुन्हे, आणि त्याचप्रमाणें आत्यंतिक स्वार्थ-त्यागाचीं कृत्यें घडत आहेत !

परंतु, **अन्नाविषयीं वाटणारी क्षुधा अश्लाघ्य किंवा अश्लील आहे असें आपण मानीत नाहीं. मग कामप्रेरणा तेवढी निंद्य आणि अशिष्ट ठरविण्यांत शहाणपणा कोणता** ? समजा, उद्यां आपण असा एक नवा निषेध शास्त्रांत सामील केला, कीं मनुष्यानें खाद्यपेय पदार्थांकडे उघड उघड पाहणें म्हणजे मोठें अनीतीचें व निर्लज्जपणाचें कृत्य होय, तर काय काय परिणाम होतील ? लहान मुलांस शिकवावें लागेल कीं 'बाळांनो, मला भूक लागली आहे असें कधीं म्हणूं नका हं.' गांवांत रस्तोरस्तीं दिसणाऱ्या खाणावळींच्या व उपाहारगृहांच्या पाट्या काढून टाकून त्यांच्या मालकांस सांगावें लागेल कीं, ' बाबांनो स्त्रीपुरुषांच्या आहाराला असें उघड उघड उत्तेजन दिल्यानें समाजांत केवढा अनाचार माजेल तुम्हांला कांहीं कल्पना आहे ?' सभ्य स्त्रीपुरुषांच्या समाजांत खाण्यापिण्याची चर्चा निषिद्ध मानावी लागेल, ज्याला जेवायचें असेल त्यानें एकांतांत दिवे मालवून जेवावें असें सांगावें लागेल, आणि, खाण्या-पिण्यासाठीं हपापणारी जीभ नेहमीं वस्त्राच्छादित रहावी अशा प्रकारें आपल्या पोषाखात आपल्याला सुधारणा करावी लागेल !

हें लिहिणें अतिरंजित आणि चमत्कारिक वाटावें असाच तें **लिहिण्यांत माझा उद्देश आहे. वर वर्णन केलें तशा प्रकारें समाजाचा व्यवहार नियंत्रित केल्यास तें हास्यास्पद होईल असें उघड उघड वाटतें ना ? तें नियंत्रण मनुष्याच्या मनोधर्माशीं सर्वस्वीं विसंगत होईल यांत संशय नाहीं ना ? त्या नियंत्रणानें समाजाचें कल्याण न होतां अकल्याण मात्र होईल हें स्पष्ट दिसतें ना ?** आणि त्यायोगें माणसें वरून मात्र

कितीहि " धुवट सोवळीं " दिसलीं तरी अंतर्यामीं तीं विटाळलेलींच रहातील, आणि एकंदर समाजाची नीति पोकळ आणि खोटी होऊन बसेल हें खास ना ?

मग हाच न्याय 'काम'प्रेरणेला लावला पाहिजे असें माझें म्हणणें आहे.

**भूक आणि 'काम' हीं दोन्हीं जर सारखींच मूलभूत व प्रधान आहेत तर दोहोंचाही विचार सारख्याच प्रामाणिकपणें व निर्भयपणें केला पाहिजे.** भुकेच्या बाबतींत कोठलाही ढोंगीपणा न ठेवतां तिच्या शमनाची सुसूत्र व्यवस्था व्हावी अशीच समाजसंस्थेची रचना आपण आस्थापूर्वक करीत आलों आहोंत. असें आपण केले नसतें तर काय अनवस्था झाली असती याची कल्पना देखील करता यावयाची नाहीं. भूक भागविण्यासाटीं मनुष्य किती भयंकर अत्याचार करावयास उद्युक्त होईल तें सांगतां येत नाहीं. त्या अत्याचारांचा मासला आपल्या प्रत्यक्ष दृष्टीला सहसा पडत नाहीं. कारण भुकेच्या प्रबलतेचा आपण आधींच नीट विचार केला आहे, आणि म्हणून भुकेमुळें उडणाऱ्या हाहाःकाराऐवजीं आणि प्रळयाऐवजीं तिनें सिद्ध झालेले सामाजिक जीवनांतील अनेक गोड व प्रेमसंवर्धक प्रकार आपल्या अनुभवास प्रत्यहीं येतात. मनुष्याच्या 'काम'प्रेरणेचाही असाच विचार करावयास नको काय ?

'काम'प्रेरणेच्या बाबतींत आपण आजपर्यंत एक मोठा गैरसमज करून घेतला आहे तो हा, कीं ती प्रेरणा केवळ इंद्रियनिष्ठ आहे, व इंद्रियतृप्ति झाली कीं त्या प्रेरणेची फलश्रुति झाली. परंतु हा समज सर्वथैव चुकीचा आहे. **कामप्रेरणेचें कार्य केवळ इंद्रियचेतना व इंद्रियतृप्ति येवढ्यापुरतें नसून मनुष्याच्या साऱ्या शारीरिक व मानसिक व्यापारांशीं तिचा निकट संबंध आहे असें आजचे शास्त्रज्ञ एकमतानें सांगत आहेत.** स्त्रीपुरुषांचें आरोग्य, शारीरिक व मानसिक तेज, स्वभावाचें माधुर्य, विचारविकारांचें सामर्थ्य, आशावादित्व, धैर्य, उल्हास, महत्त्वाकांक्षा—या सर्व गोष्टी कामप्रेरणेशीं

संलग्न आहेत. मानवी व्यवहाराच्या प्रत्येक अंगाशीं त्या प्रेरणेचा कमी अधिक संबंध आहे. त्या प्रेरणेचें कार्य व परिणाम केवळ संभोगकृतीपुरते मर्यादित नसून अनेकविध व सर्वंकश आहेत. अर्थातच **स्त्रीपुरुषांस विवाहाचा मार्ग दाखवून दिला कीं संपलें, त्यापलीकडे कामप्रेरणेचा विचार तो काय करावयाचा असें समाजव्यवस्थिति करणाऱ्या शास्त्रकारांनीं समजून चालावयाचें नाहीं !** विवाहाव्यतिरिक्त मैथुनकृत्य निषिद्ध मानणें सामाजिक जीवनाच्या दृष्टीनें कदाचित् समर्थनीय ठरेल; परंतु मैथुनकृत्याखेरीज कामप्रेरणेचा दुसरा कांहीं हेतूच नाहीं असें मानणें गाढ अज्ञानाचें होय. आणि ही वृथा समजूत गृहीत धरून स्त्रीपुरुषाच्या व्यवहारावर नियंत्रण घालणें नुसतें वेडेपणाचेंच नव्हे तर आत्मघातकीपणाचेंच म्हटलें पाहिजे.

मानवी शरिरातील विविध ज्ञानतंतू आणि रासायनिक स्राव करणाऱ्या ग्रंथी यांच्या व्यापारावर मिथुनकृत्याचा मोठा परिणाम होतो याबद्दल आता शंका राहिलेली नाहीं. प्रत्यक्ष मिथुनकृत्य जेथें अनेक कारणांनीं संभवत नाहीं तेथेंही परस्परांविषयीं वाटणाऱ्या गूढ कामाकर्षणानें देखील स्त्रीपुरुषांच्या ज्ञानतंतूंस व रसस्रावी ग्रंथींस पुष्कळशी चालना मिळते, असें शास्त्रज्ञांचें निश्चित मत आहे. म्हणजे मिथुनाची गोष्ट अजीबात सोडून दिली तरी परस्परांविषयींच्या आकर्षणानें एकत्र आलेल्या स्त्रीपुरुषांनीं मनमोकळेपणानें परस्पर सहवास—संभाषणाचा उपभोग घेतल्यास त्याचा त्यांच्या शारिरिक आरोग्यावर हितकारक परिणाम होईल असेंच मानलें पाहिजे.

कामप्रेरणेमुळें होणाऱ्या मानसिक घडामोडी तर या शारीरिक घडामोडीहूनही अधिक महत्वाच्या आहेत, व त्यांचा निर्देश मी अधिक विस्तारानें व कटाक्षानें करूं इच्छितों. कामप्रेरणेचें पर्यवसान मिथुनकृत्यात होणें साहजिक आहे, पण त्या पर्यवसनाखेरीज त्या प्रेरणेचें दुसरें कांहीं पर्यवसान व कार्यच नाहीं असें समजूं नये. त्या प्रेरणेचे दुसरे अनेक परिणाम आहेत, व तेही आपापल्यापरी फार महत्वाचे आहेत. कामप्रेरणेंतून उद्भवणारें मिथुनकृत्य एका बाजूला

व त्या प्रेरणेंतून उद्भवणारे मनोधर्म व मनोव्यापार दुसऱ्या बाजूला अशी जर आपण ताजव्यांत घातली, तर कोणतें पारडें वर जाईल व कोणतें खालीं राहील तें सांगतां येणार नाहीं. कारण प्रजोत्पत्तीला मिथुनकृत्य आवश्यक आहे, त्याचप्रमाणें मानवी जीवित बुद्धिविलासानें व कलासंवर्धनानें काव्यमय व उच्च कोटीचें व्हावें एतदर्थ कामप्रेरणाजन्य मनोधर्मांची व मनोव्यापारांची आवश्यकता आहे.

हे मनोधर्म व मनोव्यापार कोणत्या स्वरूपाचे असतात, व त्यांची एकंदर मानवी संस्कृतीस केवढी गरज आहे याची थोडक्यांत कल्पना देतां येण्यासारखी आहे. असें पहा, मुलगा किंवा मुलगी यौवनप्रविष्ट होऊं लागतांच त्याला किंवा तिला कोणते नवे अनुभव येऊं लागतात ? व्यक्ती तितक्या प्रकृती हा न्याय इतर कोणत्याही गोष्टीपेक्षां या अनुभवांस लागू केला पाहिजे असें कोणी कोणी म्हणतात; व तें कांहींसें खरेंही आहे. पण सामान्यत: येवढें खचित म्हणतां येईल, कीं या अनुभवांचा प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यावर फार मोठा परिणाम होतो. यौवनप्रारंभाच्या काळांत स्त्रीपुरुषांच्या शारीरिक धर्मांत व प्रक्रियांत विलक्षण क्रांति घडते यांत तर वादच नाहीं. पण या क्रांतीबरोबरच—आणि कदाचित् असें म्हणावें लागेल, कीं या क्रांतीमुळें—माणसाच्या मनःक्षेत्रांतही कित्येक नवीन आणि अतिप्रबल गुणधर्मांचा लोंढाच्या लोंढा येऊन धडकतो.

यौवनाचा उद्भव होण्याच्या कालांत माणसाच्या मनःसागरावर एकाएकीं ज्या अनेक विचारविकारांची भरती येते त्या सर्वांच्या स्वरूपाचें सामान्यतः असें वर्णन करतां येईल कीं, कसल्या तरी अमर्याद आणि अनामिक ओढीचीं किंवा हुरहुरीचीं तीं विविध रूपें होत. तारुण्योद्भवाच्या वेळीं प्रगट होणाऱ्या केवळ शारीरिक प्रेरणेचा विचार केला तरी तीसुद्धां संदिग्ध, आणि अनामिक अशीच असते असें म्हणावें लागेल. त्या कालांत माणसाच्या शरिराला कांहीं तरी हवेंसें वाटतें यांत संशय नाहीं; परंतु काय हवें तें त्याला नीटसें माहित नसतें यांतही संशय नाहीं. प्रत्यक्ष मिथुनकृतीचा त्या वेळीं अनुभव नसतो, आणि त्याबद्दलची ऐकीव माहितीही फारच थोडी असते. सर्व शारीरिक शक्ति ज्या

कृत्यासाठीं उच्चंबळत असतात त्या कृत्याचें स्वरूप अमुक प्रकारचें आहे असें ज्ञान यौवनप्रविष्ट होणाऱ्या स्त्रीपुरुषांस क्वचितच असतें. त्या बाबतींत एक प्रकारचा रम्य मुग्धपणा त्यांच्या ठिकाणीं असतो. प्रथम संभोगाच्या वेळीं या मुग्धपणास भयंकर धक्का बसून स्त्रीला पुरुषाचा किंवा पुरुषास स्त्रीचा विलक्षण किळस येण्याचाही संभव असतो. सारांश, यौवनप्राप्तीच्या वेळीं शरिरास कसली तरी हुरहूर वाटूं लागते हें जसें खरें, तसेंच ती हुरहूर बहुतांशीं संदिग्ध, अस्पष्ट, आणि अनामिक असते हेंही खरें.

आणि हीच गोष्ट त्या काळांत उत्पन्न होणाऱ्या मानसिक हुरहुरी-बद्दलही खरी असते, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कसल्या तरी गूढसंवेद्य परंतु अवर्णनीय अशा ओढीनें अंतःकरण तरल झालेलें असतें. आपणा-हून भिन्न असें दुसरें कांहीं तरी आहे, व त्याची व आपली भिन्नता सर्वस्वीं नाहींशीं करून एकतानता आणि अभिन्नता प्रस्थापित केली पाहिजे अशी जिवाला जबरदस्त तळमळ लागलेली असते. जोग घेणाऱ्या स्त्रीपुरुषात ऐन तारुण्याच्या उमलत्या दशेंत तो घेणाऱ्यांची संख्या बरीच मोठी असते हें एरवीं मोठें चमत्कारिक दिसतें; परंतु, मी म्हणतों ती गोष्ट लक्षांत घेतल्यावर त्याचा चमत्कार मानण्याचें कारण उरणार नाहीं. अज्ञात व अज्ञेय अशा कशाशीं तरी एकरूप होण्यासाठीं यौवन-प्रारंभांतल्या जिवाला विलक्षण अधीरता आलेली असते; आणि ईश्वर म्हणजे त्या अज्ञेयाचें व अज्ञाताचें परमोच्च स्वरूप असें मनाला जर प्रसंगविशेषानें पटलें तर ईश्वरप्राप्तीच्या मार्गाला मनुष्य तात्काळ लागतो. ईश्वराप्रमाणेंच राष्ट्र, मानवजाति यांशीं स्वतःच्या जीविताचें ऐक्य कल्पून मनुष्य त्या त्या कार्यांत उडी घेईल असाहि संभव तारुण्याच्या प्रथमदशेंत असतो.

म्हणजे, **कोठल्या तरी कमनीय, सुंदर ध्येयाचें आकर्षण नवतारुण्यांत माणसाला वाटूं लागतें, व त्या ध्येयाशीं मीलन घडण्याची जबरदस्त उत्कण्ठाही त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होते** असें म्हणतां येईल. ईश्वराप्रमाणेंच निसर्गसौंदर्याची दृष्टीहि या वयांत

एकदम येतें, व सामान्यतः स्त्रीसौंदर्याचें विशेष आकर्षण वाटूं लागतें. स्त्री ध्येय व चिंतनीय आहे अशी भावना होते, तिच्याविषयींची परोपरीची जिज्ञासा वाढते, तिच्या बोलण्या चालण्यांत, हावभावांत व अंगविक्षेपांत सौंदर्यबुद्धीची तृप्ति होते, आणि तिच्यांतील व आपल्यांतील दूरत्व नाहींसें करण्यासाठीं जीव उतावळा होतो.

स्त्रीशीं संमीलनसुख घ्यावयाचें असेल तर आधीं तिला वश करून घेणें आवश्यक असतें, व त्यामुळें प्रियाराधनाचे विविध प्रकार अस्तित्वांत येतात. काव्यनृत्यसंगीतादि कलांस यामुळें फार मोठी चालना मिळते. **ललितकलांचा उगम मनुष्याच्या कामप्रेरणेंत होतो असें जरी म्हणतां येणार नाहीं तरी कामप्रेरणेनें त्या कलांचा अतिशय परिपोष होतो यांत किमपि संशय नाहीं.** चित्र, गीत, अभिनय, गद्यपद्यात्म प्रणयपत्रिका इत्यादि साधनांनीं प्रियाराधन उत्कृष्ट प्रकारें साध्य होतें हें एकदां कळल्यावर कामप्रेरित स्त्रीपुरुष त्या साधनांचा उपयोग करूं लागतात. आणि मानसशास्त्रात असा एक सिद्धांत आहे, कीं नैसर्गिक प्रेरणेचें समाधान कराणारी जी साध्य वस्तु असते त्या साध्य वस्तूइतकेंच सुखकारित्व तिच्या साधनांस कालांतरानें येतें. हा न्याय कामप्रेरणेस अर्थातच लागूं आहे. त्यामुळें प्रियाराधनाच्या बाबतींत चित्रसंगीतकाव्यांची प्रथम जरी केवळ साधनें म्हणूनच योजना होत असली, तरी हलकें हलकें साध्याचेंच महत्व आणि रंजकत्व त्यांस प्राप्त होतें, व केवळ तज्जन्य आनंदासाठींच त्या कृती मनुष्यास हव्याशा वाटूं लागतात. मानवी जीवितांत ललितकलास फारच महत्वाचें स्थान मिळाल्याशिवाय रहात नाहीं त्याचें हें एक प्रमुख कारण होय.

जीवशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांपैकीं एक तत्त्व असें आहे, कीं कोठल्याही जिवाच्या ठिकाणीं चैतन्य स्फुरण पावलें, कीं त्या चैतन्यामुळें कांहीं तरी कार्य घडून आलेंच पाहिजे. एखाद्या बांधलेल्या कुत्र्याला मांजर दिसलें तर त्याला पकडण्याची निसर्गसिद्ध प्रेरणा जागृत होऊन त्या कुत्र्याच्या ठिकाणीं चैतन्याचें स्फुरण होईल. बद्ध स्थितींत असल्या-मुळें मांजरावर झडप घालणें त्याला शक्य असणार नाहीं; पण तें निदान

जागच्या जागीं मोठ्यानें भुंकेल व गुरगुरेल अशा प्रकारें स्फुरण पावलेल्या चैतन्याचा विनियोग होईल. म्हणजे पाण्याचा प्रवाह जसा ठराविक मार्ग बंद केल्यास अन्यमार्गानें गेल्यावांचून रहात नाहीं, तसेंच चैतन्याचेंही ( Energy ) आहे. त्या चैतन्याची एखादी निष्पत्ति बंद केली तर अन्य प्रकारें त्याची निष्पत्ति होते.

स्त्रीपुरुषांस परस्परांविषयीं जें आकर्षण वाटतें–ज्यास 'कामप्रेरणा' असें नांव प्रस्तुत विवेचनांत दिलें आहे– तें आकर्षण म्हणजे तरी एक प्रकारचें चैतन्यच (Energy) होय. तें उद्भवलें कीं त्याची अखेरी मिथुनांत व्हावी हा एक मार्ग झाला. परंतु याखेरीज त्या चैतन्याचा दुसरा कोणत्याही प्रकारें विनियोग घडणेंच शक्य नाहीं असें मुळींच नव्हे. ठराविक व्ययाच्या मार्गांत कांहीं अडथळा असेल तर अन्य प्रकारें व्यय व्हावा हा चैतन्याचा सर्वसाधारण नियम कामप्रेरणेसही लागू आहे. या नियमास इंग्रजींत Sublimation चा नियम म्हणतात. आपण मराठींत त्याला 'विकल्पव्यय' असें नांव देऊं. हा नियम ध्यानांत घेतला म्हणजे स्त्रीपुरुषांच्या परस्पर वृत्तीबद्दलच्या व व्यवहारा-संबंधींच्या आपल्या रूढ कल्पना टाकून नव्या शास्त्रशुद्ध कल्पनांचा स्वीकार करणें आवश्यक वाटतें.

कामप्रेरणेला मिथुनाखेरीज दुसरा कांहीं हेतूच नाहीं, व तदुद्भव चैतन्याचा मिथुनाखेरीज दुसरा व्ययच नाहीं, अशी चुकीची कल्पना शास्त्रकारांनीं गृहित धरली, म्हणून स्त्रीपुरुषांनीं परस्परांचा संपर्क ठेवूं नये अशा उपदेशाचा प्रसार झाला, व या ध्येयास पोषक ठरतील अशा आचारांचा आणि रूढींचा प्रचार होत गेला. परपुरुष व परस्त्री भयंकर स्फोटक द्रव्यासारखीं मानलीं जाऊं लागलीं, आणि त्यांजविषयीं वाटणाऱ्या आकर्षणाचा शक्य तों बींमोड करणें हें नीतिमत्तेचें आणि मोक्षसिद्धीचें एक प्रधान अंग ठरून गेलें. याप्रमाणें खोट्या मानसशास्त्रांतून खोट्या नीतीचा उगम झाला; आणि या नीतीचे दुष्परिणाम आपल्या सामा-जिक व वैयक्तिक जीवनावर विविध प्रकारें झाले.

या दुष्परिणामांची सविस्तर चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. येथें इतकेंच म्हणूं, कीं कामप्रेरणेविषयीं उगीचच विपरीत ग्रह करून घेऊन

आपण आपलें आयुष्य कष्टाचें व त्रासाचें करून टाकलें आहे. मानसशास्त्राच्या खऱ्या सिद्धान्तानुसार आपल्याला आपल्या जीवनाची घडी बसवायची असेल तर कामप्रेरणेला भिण्याऐवजीं तिचा आपल्या हिताकडे उपयोग करून घ्यावयास आपण शिकलें पाहिजे.

कामप्रेरणेला मिथुन हा एकच हेतु आणि व्ययमार्ग नाहीं; त्या प्रेरणेच्या बुडाशीं इतर अनेक हेतु आहेत; त्या प्रेरणेचा परिणाम मिथुनाव्यतिरिक्त इतर अनेक प्रकारें मानवी देहावर व मनावर होतो; अंतःकरणांतल्या नानाविध सुप्त शक्तींस जागृत करणारी व भरती आणणारी अशी ती एक गूढ प्रेरणा आहे; इत्यादि गोष्टी ध्यानांत घेतल्या, कीं स्त्रीपुरुषांचा सहवास, सहसंभाषण, सहविहार, सहशिक्षण घातुक नसून व्यक्तीच्या आणि समाजाच्या सर्वांगीण वाढीस आणि उन्नतीस अत्यंत आवश्यक आहे असें म्हणणें भाग पडतें. आज आपल्या समाजांत अशी विचित्र स्थिति आहे, कीं लग्नगाठींच्या सर्टिफिकिटानें जीं दोन माणसें एकत्र येतात तीं काहीं परस्पर आकर्षिलीं गेलीं म्हणून नव्हे, तर त्यांना वडीलधाऱ्यांनीं एकत्र आणलें म्हणून. अशा लग्नांमुळें नवरे परस्त्रियांकडे व बायका परपुरुषांकडे आकर्षिल्या गेल्या तर तें क्रमप्राप्तच म्हणावें लागेल. पण या आकर्षणाचें मिथुनाखेरीज दुसरें कांहीं कार्यच असणें शक्य नाहीं अशा खोट्या भयानें आमच्या नीतिकारांनीं तें आकर्षण सर्वस्वीं निषिद्ध म्हणून वेशीवर टांगलें ! **म्हणजे जे स्त्रीपुरुष एकत्र येतात त्यांच्यांत कामप्रेरणा संभवत नाहीं; आणि ज्यांच्यांत ती संभवते त्या स्त्रीपुरुषांस एकत्र येण्याची परवानगी नाहीं !**

ही हास्यास्पद अनवस्था ताबडतोब बदलली पाहिजे. कामप्रेरणेखेरीज स्त्रीपुरुषांचे विवाह घडतां कामा नयेत असें आपण केलें पाहिजे हें एक; आणि शिवाय विवाहाव्यतिरिक्तही कामप्रेरणेचा उद्भव व विकास होऊं शकतो आणि मानवी जीवनास तो अनेक प्रकारें उपकारक ठरतो, हें ध्यानांत ठेवून आपल्या व्यवहारास आपण नवें वळण दिलें पाहिजे हें दुसरें. या दोन सुधारणा आपण घडवून आणल्या तर दंभनीतीमुळें जें नानाविध दुःख आपल्याला आज भोगावें लागत आहे तें बहुतांशीं नष्ट होऊन आपलें वैयक्तिक व सामाजिक जीवन किती तरी सुखकारक आणि तेजस्वी होईल !

## प्रकरण ११ वें

मागच्या तीन प्रकरणांतील विवेचनांत एक सामान्य सिद्धान्त सूचित करण्याचा माझा हेतु असल्याचें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. तो सिद्धान्त असा, कीं मनुष्यानें आपल्या नैसर्गिक प्रेरणा, त्या केवळ नैसर्गिक आहेत म्हणून, अनिष्ट मानण्याचें, व तसें मानून त्या लपविण्याचें अगर त्यांचा निरोध करण्याचें कांहीं कारण नाहीं. हा लपंडाव आणि निरोध एक तर शक्य नाहीं; आणि तो शक्य असला तरी आवश्यक अगर युक्त नाहीं. असल्या लपंडावाचे अंतिम परिणाम व्यक्तीस व समाजास तापदायक झाल्यावांचून रहात नाहींत. आपल्या हिंदु समाजाच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाची रचना करणाऱ्यांनीं हा सिद्धान्त जाणला नव्हता, व त्यामुळें आपले आचारविचार, आपल्या रूढी, धर्म, नीति इत्यादि संस्था, श्रेयसाच्या व त्याच्या साधनांच्या कल्पना, या सर्वांचेंच स्वरूप असें बनत गेलें, कीं प्रत्येक व्यक्तीला आपल्या स्वभावाशीं सतत झुंज करीत बसण्याची पाळी यावी. आपलें मानसशास्त्र चुकीचें होतें हें आपण उमजावे, नवमानसशास्त्राच्या कल्पना आपण स्वीकाराव्या, त्या कल्पनांनुसार आपले आचारविचार बदलावे, आणि सध्यांची ही श्रमकारक झुंज थांबवावी या हेतूनेंच प्रस्तुत विषयाची आतांपर्यंतची मांडणी मीं केली आहे.

नवमानसशास्त्रांतील ज्या दोन सिद्धान्तांकडे अलीकडे शास्त्रज्ञांचें फारच लक्ष वेधलें आहे, व ज्या सिद्धान्तांचा केवळ मानसशास्त्राच्या स्वरूपावरच नव्हे, तर मानवी जीविताच्या अनेक अंगोपांगांवर मोठा परिणाम झाला आहे व होत राहणार आहे, ते सिद्धांत गेल्या तीन प्रकरणांत नुसते ध्वनित केले. आतां मात्र वाचकांपुढें ते स्पष्टपणें मांडतों. ते असेः—

**१. मानवी स्वभावांत ज्या अनेक प्रेरणा आहेत त्यांपैकीं अमुक तत्त्वतः इष्ट व अमुक तत्त्वतः अनिष्ट असा भेद करतां येत नाहीं.**

२. ज्या प्रेरणांचा, त्या अनिष्ट अशा समजुतीनें, आपण निरोध करतों त्या तसल्या निरोधानें नष्ट होतात असें मानणें वेडेपणाचें आहे. त्या नाहींशा होत नाहींत; डोळ्याआड होतात इतकेंच ! त्यांचें कार्य गुप्त स्वरूपांत चालूच राहतें.

यांतील शेवटचें विधान फार महत्त्वाचें आहे. 'मानसमंथन' ( Psycho-Analysis ) म्हणून जो वाद अलीकडे अधिकाधिक मान्य होत गेला आहे त्याचें सार या विधानांत आहे. या वादाला हल्लीं इतकें महत्त्व प्राप्त झालें आहे, कीं New Psychology व Psycho-Analysis हे शब्द समानार्थी समजले जातात. म्हणजे नवमानसशास्त्राचें सारें मर्म या वादांत आहे असें मानलें जातें. अर्थात् प्रस्तुतसारख्या प्रतिपादनात या वादाचें स्वरूप वाचकांस समजावून सांगणें अत्यंत अवश्य आहे; व तें सांगण्यास सोयीची अशी वाचकांच्या मनाची भूमिका गेल्या तीन प्रकरणांत मीं तयार केली असल्यामुळें 'मानसमंथन' वादाविषयींची जी माहिती समाजांतल्या प्रत्येक सुबुद्ध स्त्रीपुरुषास असली पाहिजे असें मला वाटतें ती द्यावयास आतां प्रारंभ करतों.

एक जराशी गमतीची वाटण्यासारखी गोष्ट अशी कीं, 'मानस-मंथन' हा वाद मानसशास्त्राचा एक भाग खरा, पण त्याचा उगम झाला तो मानसशास्त्रांतून नव्हे तर वैद्यक शास्त्रांतून! मोटारचा धक्का लागून हात मोडल्यानें जसा मनुष्य आजारी पडतो तसाच वाईट बातमी कळल्यामुळें किंवा एकाद्या बाबतींत त्याच्या इच्छेचा कोंडमारा झाल्या-मुळेंही तो आजारी पडतो. पहिल्या प्रकारच्या विकारावर लागूं पडणारीं औषधें डॉक्टरच्या संग्रहीं असतात; पण दुसऱ्या प्रकारच्या विकारांवर काय इलाज करावा तें डॉक्टरी विद्येंत सांगितलेलें नसतें. हाताचा सांधा निखळला तर त्यावर डॉक्टरी इलाज आहे, पण मनोभंग झाला तर त्यावर नाहीं, किंवा कुणी एकाच कल्पनेचें वेड घेतलें तर त्यावर नाहीं, किंवा आपण दुःखी व अभागी आहोंत अशा भ्रमाची भावना एखा-द्याला झाली तर त्यावरही नाहीं. अशा विकृतींच्या बाबतींत औषधांचे डोस किंवा टोंचण्याच्या लसींचा कांहीं एक उपयोग नाहीं.

मग ? अशा विकृतींचा निरास करावयाचा कसा ?

या प्रश्नानें प्रेरित होऊन व्हिएन्ना येथील फ्रॉइड (Freud) नांवाचा एक डॉक्टर विचार करूं लागला, व त्याच्या त्या विचारांचें परिपक्व फळ म्हणूनच 'मानसमंथन' वादाचा उदय झाला.

डॉक्टर फ्रॉइडच्या मतें या जगांत व्यक्ति व समष्टि यांची अव्याहत झुंज चाललेली आहे. व्यक्तीच्या ठिकाणीं निसर्गतः नानाविध प्रेरणा व वासना असतात, आणि समाजांत प्रचलित असलेल्या रूढी व नीतिनियम यांशीं त्या प्रेरणा व वासना विरुद्ध असतात. त्यामुळें त्यांचा कोंडमारा होत राहतो.

जो तो मनुष्य निषिद्ध प्रेरणा आपापल्या मनःक्षेत्रांतून निपटून टाकीत असतो. अशा निपटलेल्या प्रेरणाची मग माणसाला आठवणही रहात नाहीं. त्याला वाटतें त्या नष्ट झाल्या. असें होतें म्हणून तर सदाचारी माणसांना वाटतें आपण दुराचारी माणसांहून अगदीं भिन्न आहोंत, परवित्त अगर परस्त्री यांजबद्दलचा अभिलाष आपल्या मनांत शपथेलासुद्धां नाहीं !

पण वस्तुस्थिति निराळीच असते. कारण, असत्प्रेरणा दृष्टिआड केल्यानें नाहींशी होते हा समजच चुकीचा आहे. तिचें नुसतें स्थान बदलतें इतकेंच. तिची जाणीव आपण ठेवीत नाहीं; पण म्हणून ती प्रेरणा नष्ट होत नाहीं. जाणिवेच्या अगदीं पृष्ठभागीं असण्याऐवजीं ती खालीं खोलांत जाते एवढेंच. आपण आपल्या स्पष्ट जाणिवेच्या राज्यांत तिला राहूं देत नाहीं. पण ती हद्दपार झाली तरी त्या हद्दीपलीकडे जागा शोधून राहतेच. किंबहुना अशा हद्दपार, निषिद्ध, निरोधित प्रेरणांचा एक संचयच तयार होत जातो. या संचयाची आपल्याला 'जाणीव' (Consciousness) नसते म्हणून त्याला आपण 'नेणीव' (Unconsciousness) असें नांव देतों; पण खरें पाहतां 'जाणीव' व 'नेणीव' दोन्हीही आपल्या मनोव्यापारांचेच भाग होत !

नेणीव ही बोलून चालून नेणीव. आपल्या जाणिवेपासून आपण तिला वेगळी केलेली असते. एक प्रकारें आपण तिला सवता सुभा नेमून

दिलेला असतो. आपल्या या योजनेप्रमाणें ती वेगळी राहिली, जाणिवेच्या क्षेत्रात तिनें लुडबुड केली नाहीं म्हणजे आपलें जीवित सुखासमाधानानें, सुरळीतपणें चालू रहातें. पण जरा कां नेणिवेनें आपली मर्यादा सोडली, व आपण जे व्यवहार जाणून बुजून व नीतिनियमांचें परिपालन करून करूं इच्छितों त्यांत तिनें डोकावण्यास प्रारंभ केला, तर मग ते सुरळीतपणें पार पडणें अशक्य होऊन बसतें! उघडच आहे हें! जें आपल्या आठवणींत राह्यला नको आहे त्याची आठवण बुजण्याऐवजीं ताजी राहूं लागली तर तें तापदायकच होणार!

नेणिवेच्या अशा तापांतच मनुष्याच्या सर्व व्याधींचा उगम असतो असें डॉ. फ्रॉइड यानें ठरविलें. ज्या प्रेरणांचा निरोध करावयाचा त्या आंवरून नेणिवेच्या अंधारकोठडींत बंदिस्त ठेवतां आल्या कीं माणूस सुखी असतो. उलट, माणसाला कोठलीहि शारीरिक अगर मानसिक व्याधी जडली, कीं खुशाल समजावें कीं नेणिवेंत बंदिस्त टाकलेल्या प्रेरणांपैकीं त्याची एखादी प्रेरणा अनावर झाली आहे, व तिनें त्याच्या जाणिवेची व्यवस्थिति बिघडवून टाकली आहे. अर्थात् कोठल्याहि व्याधीचें खरें निदान करावयाचें असेल, तर नेणिवेंतून सुटून जाणिवेंत घुसूं पाहणारी ही बंडखोर प्रेरणा कोणती त्याचा शोध केला पाहिजे.

या शोधाच्या बाबतींत फ्रॉइड यानें एक अगदीं नवा व सकृद्दर्शनीं अत्यंत चमत्कारिक सिद्धान्त पुढें माडला. तो असा, कीं साऱ्या मानवी व्याधींचें मूळ कामप्रेरणेच्या कोंडमाऱ्यात आहे!

फ्रॉइडनें असा सिद्धांत मांडला याचें कारण त्यानें एक विशिष्ट विचारसरणी पत्करली हें होय. त्याला वाटलें, व्याधींचा उगम नेणिवेच्या अनावरपणांत, व नेणिवेचा उगम समाजानें व्यक्तींवर लादलेल्या आचारानियमांत, अशी जर परंपरा आहे तर सर्व व्याधींचें एकच सामान्य निदान ठरवायचें असेल तर आपण एका प्रश्नाचें उत्तर शोधलें म्हणजे झालें. तो प्रश्न असा, कीं अशी कोणती प्रेरणा आहे, कीं जी अनादि कालापासून धर्मशास्त्रकारांनीं निषिद्ध ठरविली आहे? जिचा

निरोध माणसाला सतत करावा लागतो? व त्यामुळेंच जी नेणिवेंतून फुटून जाणिवेची घडी विस्कटून टाकील असा संभवही सर्वांत अधिक?

या प्रश्नाचें उत्तर उघड आहे. सर्व देशांत आणि सर्व कालीं निषिद्ध ठरलेली जर कोणती मानवी प्रेरणा असेल तर ती आईविषयीं मुलाला किंवा बापाविषयीं मुलीला वाटणारी कामप्रेरणा होय. इतर विधिनिषेध देशकालपरत्वें भिन्न भिन्न असतील; परंतु या निषेधाच्या बाबतींत भिन्नता आढळणार नाहीं.

आणि, नवल असें, कीं हा निषेध जसा निरपवाद आहे तशीच ती कामप्रेरणाहि सर्वत्र आढळून येणारी आहे. फ्रॉइडच्या नवमानसशास्त्रानें साऱ्या लोकाना विस्मयाचा जबर धक्का बसला याचें कारण असें, कीं तो म्हणूं लागला, मात्रागमनाची प्रेरणा प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं आहे. या प्रेरणेला Oedipus Complex असें इंग्रजींत नांव आहे. आपण तिला 'मात्रागमनाची प्रेरणा' म्हटल्यास योग्य तो बोध सहज होईल. फ्रॉइडच्या मतें ही प्रेरणा सर्वांच्या ठिकाणीं आहे, ती सारखी निरोधित होत आहे, व ती नेणिवेचा बांध फोडून अनावर झाली म्हणजेच माणसाला शारीरिक अगर मानसिक व्याधि जडते.

प्रत्येक मनुष्य कृतीनें नाहीं पण मनानें मात्रागमनी असतो हें विधान भयंकर होतें, व तें करतांना त्याबद्दलचीं प्रमाणें देणें फ्रॉइडला भाग होतें. तो म्हणाला, माणसाची कामप्रेरणा यौवनांत प्रथम जागृत होते असें मानणें चुकीचें आहे. कामप्रेरणा व तिचें समाधान बालवयांतच सुरू होतें. आई मुलाचे मुके घेते, त्याला हृदयाशीं घट्ट धरते, व त्याला कुरवाळते म्हणजे तीं काय करते? तर ती त्याच्या कामप्रेरणेचीच पूर्तता करीत असते. म्हणजे पुरुषाची प्रथम कामसिद्धि करणारी कोण, तर त्याची आई! पुरुष जसजसा वयानें वाढत जातो ततसें त्याच्या कामक्रियेचें स्वरूप बदलत जातें, व त्या क्रियेचा विषयही भिन्नभिन्न होत जातो. स्तनपान ही पहिली कामक्रिया. पण मूल मोठें झालें म्हणजे त्याला स्तन मिळत नाहीं, व मग तें आपलेंच बोट चोखूं लागतें. म्हणजे कामक्रियेंत प्रथम फक्त मुखाचा चाळा असतो तो हळुहळूं त्यांत हाताच्या

चाळयाचाहि अंतर्भाव होतो. यानंतर मूल आपल्या हातानें आपलें लिंग चाचपूं लागतें. त्यांत त्याला सुख होतें व त्यामुळें स्वतःच्या देहावर तें प्रीति करूं लागतें. यानंतरची अवस्था म्हणजे सजातीय ( पुरुषाचें पुरुषांवर व स्त्रीचें स्त्रियांवर ) व्यक्तीवरचें प्रेम. आणि सगळयांत अखेरची पायरी भिन्नजातीय देहाविषयींची प्रेरणा. या सर्व अवस्थांतून अखेरच्या प्रेरणेपर्यंत जी व्यक्ति पोंचते तिची कामप्रेरणा योग्य प्रकारें कार्य करीत आहे असें आपण म्हणतों. आणि ज्या व्यक्तींच्या कामाचारांत कांहीं तरी विकृति असल्याचें आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें त्यांच्या बाबतींत काय प्रकार घडतो ? तर त्यांची कामप्रेरणा पूर्ण प्रगत होण्याऐवजीं मधल्याच कोठल्या तरी टप्प्यावर अडखळून राहते. आणि मग स्वसंभोग ( Auto-eroticism ) अथवा सजातीय संभोग ( Homosexuality ) अशा प्रकारांनीं त्यांची कामसिद्धि होऊं शकते.

अशा प्रमाणांनीं जो मुख्य सिद्धांत फ्रॉइडला बळकट करावयाचा होता तो हा, कीं सर्व मानवी व्याधीचें मूळ कामप्रेरणेंत आहे. या प्रेरणेचा व्यय आणि निरोध योग्य प्रमाणांत होत असेल तोंपर्यंत माणसाचें आयुष्य सुखासमाधानांत जात असतें. पण हें प्रमाण बिनसलें, व कामप्रेरणेच्या व्यवस्थितींत बिघाड उत्पन्न झाला कीं लगेच व्याधि उद्भवली पाहिजे.

येथपर्यंत फ्रॉइडनें काय केलें ? तर सर्व मानवी व्याधींचें एक सामान्य निदान ठरविलें. पण एवढ्यावरच त्याला थांबतां येत नव्हतें. कारण त्याला मानवी व्याधींवर उपाययोजनाही ठरवावयाची होती. तो डॉक्टर होता. त्याला केवळ निदानाची चर्चा करायची नव्हती, तर एक प्रभावी उपचारपद्धति निश्चित करायची होती.

जी उपचारपद्धति फ्रॉइडनें अखेर ठरविली व यशस्वी करून दाखविली तिच्यांत दोन गोष्टींचा अंतर्भाव होतो. एक Analysis म्हणजे ' मंथन ' आणि त्यानंतर Sublimation म्हणजे ' विकल्पव्यय.' एखाद्या व्याधिग्रस्त इसमावर उपचार करावयाचा झाल्यास फ्रॉइड प्रथम त्यास परोपरीचे प्रश्न विचारून त्याच्या परिस्थितीची व पूर्वचरित्राची माहिती

मिळवी. त्याच्या जाणिवेची व नेणिवेची ती चीरफाडच एक प्रकारची! म्हणूनच तिला Psycho-Analysis असें नांव मिळालें. असल्या चीरफाडीनें नेणिवेच्या तळाशीं कोठें तरी दडलेली असंतुष्ट कामप्रेरणा शोधून वर काढण्याचा फ्रॉइडचा मुख्य हेतु असे, हें ध्यानांत घेऊनच तिला 'मानसमंथन' ही संज्ञा मी प्रचारांत आणूं इच्छितों. मनोविश्लेषण ही संज्ञा क्वचित् सुचविलेली आढळते; पण सौष्ठव आणि अभिप्राय या दोन्ही दृष्टींनीं 'मानसमंथन' हा प्रयोग सर्वांना अधिक आवडेल असें वाटतें.

मानसमंथन केल्यानें फक्त व्याधीचा उगम नक्की कोठें झाला तें कळतें. त्यापुढचें डॉक्टर फ्रॉइडचें काम त्या व्याधिकारक असंतुष्ट कामप्रेरणेला प्रगट होण्यास सवड काढून देणें. म्हणजे असें कीं, समाजांत रूढ असलेल्या विधिनिषेधांमुळें त्या प्रेरणेचा अमुक एका विशिष्ट प्रकारचा व्यय अशक्य कोटींतील असेल, तर तिच्या व्ययाचा दुसरा कांहीं विकल्प योजणें. यालाच इंग्रजींत Sublimation म्हणतात. आपण 'विकल्पव्यय' असें म्हणूं.

एखादा मनुष्य फ्रॉइडकडे आला, व मानसमंथनाच्या साह्यानें फ्रॉइडला असें दिसून आलें, कीं प्रीतिविषय झालेल्या व्यक्तीला हाणमार अगर दुखापत करण्याची त्याला फार हौस वाटते, व ही हौस अतृप्त राहिल्यामुळें त्याच्या ठिकाणीं व्याधि उत्पन्न झाली आहे, तर त्याला शल्यशास्त्राचा (Surgery) अभ्यास करावयास फ्रॉइड सांगे. हेतु असा, कीं त्याच्या हत्यासक्तीला चांगलें वळण मिळून त्या प्रेरणेचा 'विकल्पव्यय' व्हावा.

एखाद्या व्याधिग्रस्त माणसाचें मानसमंथन करतां करतां जर असें आढळलें, कीं त्याच्या ठिकाणीं अत्याचाराची प्रेरणा विशेष प्रमाणांत वास करीत आहे, तर फ्रॉइड त्याला लेखक व्हावयास सांगे. हें सांगण्यांतला हिशोब अर्थातच असा, कीं त्याची ती प्रेरणा अतृप्त राहिली कीं व्याधि कायम राहणार, बरें तिची तृप्ति—म्हणजे सामान्यपणें व्हावयाचा तसा व्यय—होऊं द्यावा म्हटलें तर तें शक्य नाहीं, कारण तो

ओळीनें लोकांचे खूनच करीत सुटेल. तेव्हां त्यानें खून करण्याऐवजीं खुनांच्या कल्पना करून त्यांविषयीं रहस्यमय गोष्टी व कादंबऱ्या लिहाव्या. असें केल्यानें समाजाचें कसलेंही अनहित होणार नाहीं; आणि त्या माणसाच्या त्या विवक्षित प्रेरणेचा ' विकल्पव्यय ' होऊन तिचा कोंडमारा व तज्जन्य व्याधि बंद होईल.

आपली नग्न काया लोकांना दाखविण्याची चमत्कारिक प्रेरणा कांहीं लोकांच्या ठिकाणीं असते, व तिच्या निरोधनामुळें त्यांचें आरोग्य बिघडतें. अशा लोकांस नृत्यकलेच्या धंद्यांत पडण्याचा फ्रॉइड उपदेश करी. अशा प्रकारें सर्वच रोग्यांच्या बाबतींत तो प्रथम निरोधित प्रेरणेचें स्वरूप मंथनानें निश्चित करी, व मग त्या प्रेरणेचा ' विकल्पव्यय ' ज्यायोगें होईल असा कांहीं तरी उपाय सांगे. या त्याच्या पद्धतीनें शेंकडों लोकांस गुण येऊं लागला, मानसमंथन वादाकडे लोकांचें लक्ष फार जोरानें वेधलें गेलें, व स्विट्झर्लंड, ऑस्ट्रिया, इंग्लंड आणि अमेरिका या देशांत या वादाला विलक्षण मान्यता प्राप्त झाली. Psycho-Analysis व Oedipus Complex हे शब्द माहित नाहींत असा सुशिक्षित इसम मिळणें अशक्य झालें.

फ्रॉइडचा मानसमंथन वाद याप्रमाणें सर्व सुशिक्षितांत पसरला हें जरी खरें तरी त्या वादाचा सारा तपशील सर्वमान्य झाला असें नव्हे. उलट तो तपशील दुरुस्त करण्याचेच प्रयत्न सारखे चालू आहेत. हे प्रयत्न करणाऱ्यांत व्हिएन्ना येथील डॉक्टर आलफ्रेड ॲडलर याची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे.

ॲडलरनें फ्रॉइडची 'विकल्पव्यया'ची उपचारपद्धति मान्य केली, परंतु सर्व व्याधींचें मूळ निरोधित कामप्रेरणेंत आहे, हें फ्रॉइडचें म्हणणें त्यास मान्य नाहीं. त्याचें मत असें आहे, कीं प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं वरचढपणा—सत्ता मिळविण्याची व मिरविण्याची एक प्रेरणा-असते; या प्रेरणेस इतर व्यक्तींकडून, समाजाकडून, अगर राज्यसंस्थेकडून परोपरीचे अडथळे होत असतात; या अडथळ्यांमुळें त्या प्रेरणेचें निरोधन होतें, व अखेर व्याधी उत्पन्न होतात.

ॲडलरनें आपला हा सिद्धांत अनेक उदाहरणांनीं सिद्ध करून दाखवला आहे. तो विस्तार येथें करतां येत नाहीं. वाचकांनीं ध्यानांत ध्यावयाचा मुद्दा एकच, कीं कामप्रेरणेला (Sex) जें एकमेवस्थान फ्रॉइडनें दिलें होतें तें ॲडलरनें 'सत्ताप्रवृत्तीस' (Power) दिलें. इतकेंच नव्हे तर कामप्रेरणेच्या कोंडमाऱ्यामुळें जे प्रकार घडतात असें फ्रॉइडनें म्हटलें होतें त्यांची संगति सत्ताप्रवृत्तीच्या मतानें लावतां येते असें ॲडलर म्हणूं लागला. लहान बालकाच्या मनांत स्वतःच्या आई-विषयीं कामप्रवृत्ति असते असें फ्रॉइडनें म्हटलें होतें. पण ॲडलर म्हणाला, नाहीं, बालकाच्या मनांत आईबद्दल कामप्रवृत्ति नसून तिच्या-वर सत्ता गाजविण्याची प्रवृत्ति मात्र असते खरी. पण घरांतल्या घरांत या प्रवृत्तीला एक मोठा अडथळा असतो. तो अडथळा म्हणजे बापाचा. मुलाला वाटतें, आईवर आपल्या एकट्याची अबाधित सत्ता असावी. हा आपला बाप कोण आपल्या आईवर सत्ता गाजविणारा? मुलगा व बाप यांच्यांत मोठेपणीं देखील विरोधाची किंचित् तरी छटा दिसते याचें कारण मुलाच्या मनांत लहानपणींच उत्पन्न होणारी असूयाबुद्धीच असावी.

म्हणजे ॲडलरचें म्हणणें असें, कीं फ्रॉइडनें कामप्रवृत्तीचें जें उगाच स्तोम माजवलें त्यांत काहीं अर्थ नाहीं. तसेंच पाहिलें तर कामप्रवृत्ति म्हणजे सत्ताप्रवृत्तीचीच–सत्तेच्या हव्यासाचीच–एक तऱ्हा नाहीं काय? एखाद्या पुरुषाचें एखाद्या स्त्रीवर मन जडलें म्हणजे काय होतें? त्याला वाटत असतें आपण हिच्या अंकित झालों, हिची सत्ता आपल्यावर प्रस्था-पित झाली. हा कमीपणा (Inferiority) त्याला खपत नाहीं. मग कशाही प्रकारें तिच्यावर आपला वरचढपणा राखण्याचे तो परोपरीचे प्रयत्न करतो. तो आपलें बुद्धिवर्चस्व मिरवील, किंवा पैशाच्या बाबतींत तिनें आपल्यावर सदा अवलंबून असावें असें करील कसेंही करून तो तिला खालीं व स्वतःला वर ठेवील. निदान प्रत्यक्ष मिथुनाच्या वेळेस तरी ती खालीं व आपण वर असें उत्तानार्थानें सिद्ध व्हावें म्हणून पुरुष प्रयत्न करतो असें ॲडलरचें मत आहे.

सारांश, निरोधित प्रेरणांमुळें प्रत्येक व्यक्तीच्या नेणिवेची (Unconsciousness) घटना होत जाते, व नेणिवेचा बांध फोडून बाहेर पडूं पाहणाऱ्या असंतुष्ट प्रेरणांमुळें मानवी व्याधी उत्पन्न होतात हीं फ्रॉइडच्या मानसमंथन वादांतील दोन मतें ॲडलरनें स्वीकारलीं. परंतु त्यानंतर त्याचें म्हणणें असें, कीं कामप्रवृत्तीपेक्षां सत्ताप्रवृत्तीच सर्वांत मूलभूत आहे, आणि तिच्या असंतुष्टतेंतूनच साऱ्या व्याधी निर्माण होतात. प्रत्येक माणूस कोठल्या तरी कमीपणाच्या जाणिवेनें (Inferiority Complex) तो कमीपणा घालवून सबल होण्यासाठीं धडपडत असतो. ही धडपड चुकीच्या मार्गानें होत असेल तर त्या व्यक्तीचें आयुष्य क्लेश-पूर्ण होतें. अर्थात् डॉक्टरचें खरें कर्तव्य हें, कीं त्याची ही धडपड योग्य मार्गाला लावून देणें.

ॲडलरनें व त्याच्या शिष्यांनीं या सिद्धान्तानुसार प्रत्यक्ष कार्य करून दाखविलें आहे. त्यांनीं व्हिएन्ना, न्यू यॉर्क वगैरे मोठमोठ्या शहरीं 'उपचारगृहें' (Clinics) चालविलीं आहेत; व आज पंचवीस वर्षांत रोगनिवारणाच्या कामीं व सामान्यतः मानवी दुःखपरिहाराच्या कामीं त्यांनीं जें यश संपादन केलें आहे तें पाहतां त्यांच्या मतांत पुष्कळच सत्यांश असला पाहिजे असें कबूल करणें भाग आहे.

'मानसमंथन' वादाच्या इतिहासांत फ्रॉइड व ॲडलर यांप्रमाणेंच तिसऱ्या एका पंडिताचें नांव अजरामर झालें आहे. तो पंडित म्हणजे स्विट्झर्लंडमधील डॉक्टर यूंग (Jung) होय. त्याचें मत फ्रॉइड व ॲडलर या दोघांच्याहि मतांहून बरेंचसें भिन्न आहे.

या मतभिन्नतेंतला महत्त्वाचा मुद्दा नेणिवेबद्दलचा. फ्रॉइड व ॲडलर यांच्या मतें प्रत्येक व्यक्तीची नेणीव तिच्या प्रेरणांना अडथळा व्हावयास लागला कीं मग बनूं लागते, म्हणून अर्थातच ज्या त्या व्यक्तीची नेणीव त्या त्या व्यक्तीपुरती–व्यक्तिगत–असते. पण यूंगचें म्हणणें असें, कीं ही समजूत चुकीची आहे. व्यक्तीव्यक्तींच्या नेणिवेच्या व्यापारांत–उदाहरणार्थ, माणसांना पडणाऱ्या स्वप्नांत–विलक्षण सारखेपणा

दिसून येतो; व या सारखेपणाची संगति एकाच सिद्धांतानें लागण्यासारखी आहे. तो सिद्धांत असा, कीं मानव जातीची म्हणून कांहीं तरी एक सामान्य, अथांग सागरासारखी, नेणीव असून व्यक्तीव्यक्तींच्या नेणिवा त्या सागराचे अंश होत.

नेणिवेबद्दलचा हा एक निराळाच सिद्धांत ज्याप्रमाणें डॉ. यूंग यानें प्रतिपादिला, त्याप्रमाणें अर्थातच प्रत्यक्ष उपचारपद्धतीच्या बाबतींतही त्याचें मत फ्रॉइड व ॲडलर या दोघांच्या मतांहून बऱ्याच अंशीं भिन्न आहे.

डॉ. यूंगच्या या भिन्न मताचें स्वरूप, व त्यांचीं कारणें विस्तारानें समजून घेण्याचें आपल्याला प्रयोजन नाहीं. मानसमंथनाच्या वादाचा या प्रकरणांत जो उहापोह केला तो अशा हेतूनें नव्हे, कीं वाचकांस त्याचीं सर्व अंगोपांगें विशद करून सांगावीं. किंबहुना मानसमंथन वादाचीं अंगोपांगें अजून नीटशीं निश्चित झालेलींच नाहींत. त्या वादावरील बरेंचसें उपलब्ध वाङ्मय वाचल्यानें मला स्वतःला असें वाटत गेलें आहे, कीं फ्रॉइडपासून तों यूंगपर्यंत प्रत्येकाच्या प्रतिपादनांत अत्युक्तीचा अंश बराच आहे. अर्थात् कोणत्याही अत्युक्तीकडे जनतेचें लक्ष चट्कन् वेधतें, पण कालांतरानें त्या अत्युक्तींतील सत्यांश तेवढा कायम राहतो, हा सामान्य न्याय मानसमंथन वादासही लागूं केला पाहिजे. मानसमंथनवादास निश्चित स्वरूप यावयाचें आहे. त्यांतील बरेच सिद्धांत गळावयाचे आहेत. म्हणून मानसमंथन वादाचा एकूण एक तपशील वाचकांस फोडून सांगण्याचा हेतु मीं धरलाच नाहीं. त्या वादामुळें मनोव्यापारांविषयींचे जे नवे सिद्धांत लोकांच्या नजरेसमोर प्रामुख्यानें आले, व जे अढळ राहतील अशी माझी समजूत आहे त्यांच्याशीं वाचकांचा परिचय करून द्यावा या उद्देशानें आतांपर्यंतची चर्चा मीं केली. हें प्रकरण पूर्ण करण्यापूर्वीं त्या सिद्धांतांचा पुनरुच्चार केल्यास आपल्या एकंदर विवेचनाला तो उपकारक होईल असें वाटतें.

मानसमंथन वादानें प्रस्थापित झालेलीं मुख्य तत्वें हीं:—

१. मनुष्याच्या अनुभवाचे दोन मुख्य भाग आहेत; एक स्मृत, व दुसरा विस्मृत; किंवा स्पष्ट आणि अस्पष्ट असें म्हणूं. याचाच अर्थ

मनुष्याला दोन मनें आहेत असा करावयास हरकत नाहीं. एका मनाचें नांव प्रगट मन ( Consciousness ) व दुसऱ्याचें नांव अप्रगट मन ( The Unconscious ).

२. मनुष्य इंद्रियद्वारां जें जें अनुभवितो त्यापैकीं बहुतेक गोष्टी 'विस्मृतां'त म्हणजे अप्रगट मनांत टाकल्या जातात. ज्या प्रेरणा मनुष्याला दाबून टाकाव्या लागतात त्याही या अप्रगट मनांत सांचत जातात.

३. मनुष्याच्या ठिकाणीं जे नाना तऱ्हेचे संकल्प उद्भवतात त्यांच्या बुडाशीं प्रगट मनापेक्षां अप्रगट मनाचेंच कार्य अधिक असतें.

४. मानवी प्रेरणांपैकीं अमुक प्रेरणा तत्त्वतः अनिष्ट होत अशा समजुतीनें त्या प्रेरणांचा जुलमानें निरोध केल्यास ते व्यक्तीला अगर समाजाला हितकारक होत नाहींत. प्रेरणानिरोधापेक्षां प्रेरणाविष्कार अधिक हितावह होय.

वरील तत्त्वें वाचल्यानंतर वाचकांच्या लक्षांत येईल, कीं प्रस्तुत प्रतिपादनाच्या पहिल्या प्रकरणापासून ज्या तत्त्वांवर मी कटाक्षानें भर देत आलों तीं आणि हीं बहुतांशीं एकच आहेत. आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनांत जीं विविध दुःखें उद्भवतात त्यांचें मुख्य कारण असें कीं, आपण आपल्या स्वभावाशीं उगीचच वेड्यासारखी झुंज करीत असतों. ही झुंज बंद करावयाची असेल तर मनुष्याच्या मनोधर्माविषयीं आणि मनोव्यापारांविषयीं निर्दोष ज्ञान आपण करून घेतलें पाहिजे; मानसशास्त्राविषयींच्या आपल्या जुन्या कल्पना टाकल्या पाहिजेत; आणि पाश्चात्य देशांतील पंडितांनीं जे नवे सिद्धांत प्रस्थापित केले आहेत ते मान्य केले पाहिजेत. या विचारसरणीनें प्रेरित होऊन प्रस्तुत विषयाची चर्चा मानसमंथन वादापर्यंत मीं आणून पोंचवली. आतां त्या वादामुळें अधिकच स्पष्ट होणाऱ्या मूलभूत तत्त्वांवर दृष्टि ठेवून आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाची पुनर्घटना करावयाची म्हटल्यास ती आपणांस कशी करतां येईल त्याविषयीं उपसंहाररूपानें थोडेंसें लिहिणेंच काय तें शिल्लक उरलें आहे.

———

# प्रकरण १२ वें

एकदां एके ठिकाणीं मी व्याख्यानास गेलों असतां व्याख्याना-नंतर एका गृहस्थांनीं जवळ येऊन व माझ्याशीं हस्तांदोलन करून मला विचारलें, ' एक प्रश्न आपणांस विचारूं काय? आपण मानसशास्त्रावर जें जें लिहितां तें मी मोठ्या आवडीनें वाचतों; पण मनुष्याचें 'मन' नक्की असतें तरी कोठें हें मला अजून कळलेलें नाहीं. कृपा करून सांगाल काय? '

हा प्रश्न विचारण्यांत त्या गृहस्थांचा काय हेतु असावा तें ओळ-खण्याइतका चाणाक्षपणा सुदैवानें माझ्या ठिकाणीं आहे. मीं त्यांना म्हटलें,

' मनाचें नक्की वास्तव्य कोठें आहे तें अजून कोणालाच कळ-लेलें नाहीं ! '

मला निरुत्तर करण्याचा बेत मीं असा हाणून पाडलेला पाहून त्या गृहस्थांना हंसूं आलें.

मीं त्यास पुढें म्हटलें,

' पण , हें पहा, मन नक्की कोठें आहे तें कळलें नाहीं म्हणून फारसे अडलेलेंही नाहीं. त्याचें नक्की ठिकाण कळलेलें नसलें तरी त्याचे धर्म व व्यापार यांजबद्दल पुष्कळच ज्ञान उपलब्ध झालेलें आहे, व त्याचा फायदा आपल्याला घेतां येण्यासारखा आहे. असें पहा, समजा, एखादा फार श्रीमान मनुष्य आहे. तो आपल्या पेढीवर येतो व व्यापा-राचीं सूत्रें हालवितो, पैशाची देवघेव करतो, मालाची मागणी करतो अथवा पुरवठा करतो, हुंड्या लिहितो आणि पटवितो, पण त्याचें खाजगी बिऱ्हाड कोठें आहे तें मात्र अजूनपर्यंत कुणालाही कळलेलें नाहीं. अशा स्थितींत त्या लक्षाधीशाचा खाजगी घरनंबर आपल्याला माहित नसला तरी विषाद मानण्याचें काय कारण आहे? त्याचा व्यापार लोकांना हवा

तेवढा कळतो आहे, आणि तेवढ्यानें लोकांचें कामही भागतें आहे, नाहीं का ? हाच न्याय मनाला लावून बघा.'

या माझ्या उत्तरानें त्या गृहस्थांचें समाधान झाल्यासारखें दिसलें. निदान माझी कुचाळकी करण्याचा त्यांचा मूळ उद्देश असला तर तो त्यांना रहित करावा लागला येवढें खास.

वाचकांसही या ठिकाणीं मला असें सांगावयाचें आहे, कीं मानस-शास्त्राची कितीही प्रगति झाली तरी मानवी मनाचें गूढ रहस्य पूर्णपणें उलगडल्याचें समाधान मनुष्याला कधींही लाभायचें नाहीं. कोणीसें म्हटल्याचें मला आठवतें, कीं बाहेरचें जग आणि आंतलें मन अशा दोन रहस्यांत सांपडून बिचाऱ्या मनुष्य प्राण्याची दामटी वळलेली आहे ! या विधानांत फार खोल अभिप्राय आहे. खरोखरच बाह्य सृष्टींतील अंतिम तत्त्व कधीं कोणाच्या हातीं सांपडेल कीं नाहीं संशय आहे ! आणि मनाचीही गोष्ट तशीच. त्याचें पूर्ण आकलन कधीं कोणाला होईल असें वाटत नाहीं !

पण हें जितकें खरें तितकेंच हेंही खरें, कीं मनाचें अंतिम रहस्य जरी कधीं उलगडलें नाहीं तरी त्याच्या व्यक्त व ज्ञेय व्यापारावर व धर्मांवर झपाट्यानें अधिकाधिक प्रकाश पडत आहे, व या नव्या माहितीमुळें मनुष्याला आपलें जीवित अधिक सुखमय करण्याची अधिकाधिक संधि लाभत आहे.

ती संधि आजपर्यंत आपण वायां जाऊं दिली, पण आतां यापुढें त्या संधीचा आपण पूर्ण फायदा करून घेतला पाहिजे, हेंच माझ्या या प्रस्तुत प्रतिपादनांतील मुख्य सूत्र.

आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनांत अधिक गोडी व सुखशांति निर्माण व्हावी अशी आपली इच्छा असेल तर मनुष्याच्या मनोरचनेबद्दल ज्या भ्रामक कल्पना आपण आजपर्यंत उगीचच गृहित धरल्या त्या धीटपणानें टाकल्या पाहिजेत. अशा कल्पनांपैकीं मुख्य ह्या कीं:—

१ मनुष्यानें सदा विचारानें वागावें.

२ मनुष्याच्या प्रवृत्तींपैकीं कांहीं प्रवृत्ती पाशवी आहेत.

३ अशा पाशवी प्रवृत्तींची माणसाला लाज वाटली पाहिजे.

४ अशा प्रवृत्तींचा माणसानें नायनाट केला पाहिणे. निदान त्या लपवल्या तरी पाहिजेत.

या सर्व कल्पना निराधार असल्याचें उत्तरोत्तर सिद्ध होत आहे. मानसमंथन वादांत कितीही अत्युक्त गोष्टींचा अंतर्भाव झाला असला तरी एक मोठा महत्त्वाचा सिद्धांत प्रस्थापित केल्याचें श्रेय या वादास निःसंशय दिलें पाहिजे. तो सिद्धांत असा, कीं तर्कबुद्धि किंवा विचार-शक्ति ही मनुष्याच्या लहान मोठ्या कृत्यामागची कारकशक्ति नव्हे. मनुष्य प्रत्येक गोष्ट विचारपूर्वक करतो असें मानणें चुकीचें होय. मागें एका प्रकरणांत मीं असें म्हटल्याचें वाचकांस स्मरत असेल, कीं मनुष्य हा संकल्पप्रधान प्राणी असून प्रत्येक संकल्पामुळें मनुष्यास अनुभवाची प्राप्ति होते व त्या अनुभवाचा नंतरच्या संकल्पावर परिणाम होतो. म्हणजे संकल्पातून अनुभव व अनुभवांतून पुन्हा संकल्प असा अन्योन्या-श्रय आहे.

मात्र मनुष्याला जे सहस्रावधी लहान मोठे अनुभव सारखे येत असतात त्यापैकीं थोडे त्याच्या स्मरणांत रहातात, आणि बाकीचे सारे विसरले जातात. असें होतें म्हणूनच ठीक ! सगळ्याच अनुभवांची सारखी स्मृति राहूं लागली तर आयुष्य किती तापदायक होईल याची कल्पना करणें अवघड नाहीं. अनुभवाचे स्मृत व विस्मृत असे भाग पडावेत हें मानवी उद्योगाच्या दृष्टीनें हितावहच आहे. तथापि जे अनुभव आपण विसरून गेलों अशी आपली समजूत असते त्यांचा आपल्या पुढील संकल्पावर कांहीं देखील परिणाम घडत नाहीं असें आपण मानतों तें चुकीचें होय. आधुनिक मानसशास्त्राचें असें सांगणें आहे, कीं जे सहस्रावधी अनुभव विस्मृतीच्या खाईत कायमचे गडप झाले असे सामान्यपणें समजण्यांत येतें, त्या सर्वांची मिळून एक संमिश्र भूमिका तयार होते; व या भूमिकेचा परिणाम मनुष्याच्या संकल्पावर

झाल्यावांचून रहात नाहीं. याचा सरळ अर्थ असा, कीं आपल्या संकल्पांचीं पाळेंमुळें विस्मृतीच्या अमर्याद प्रदेशांत कोठें दडलेलीं असतील त्याचा नेम नाहीं ! म्हणजे केवळ विचारानें अथवा तर्कबुद्धीनें माणूस या जगांत वागतो—तसें वागणें हा मनुष्याचा निसर्गधर्म आहे—या म्हणण्यांत फारसा तथ्यांश नाहीं.

अर्थात् केवळ विचारानें व तर्कबुद्धीनें मनुष्यानें वागावें असा नियम घालून देण्यांतही शहाणपणा नाहीं. कर्कश विचारसरणीला अथवा तर्काला जेवढें पटेल तेवढें विहित व बाकीचें सारें निषिद्ध अशा समजुतीच्या पायावर मानवी व्यवहार आंखून दिल्यानें ते व्यवहार कल्याणप्रद होतील या हिशोबांत कांहीं अर्थ नाहीं. विचारापेक्षां ज्ञात व अज्ञात प्रेरणांचा जोर मनुष्याच्या ठिकाणीं निसर्गतःच जर अधिक आहे तर निश्रेयसाच्या प्राप्तीसाठीं मनुष्यानें सर्वस्वीं त्या निसर्गाविरुद्ध आपली वागणूक ठेवावी असें सांगण्यांत कोणतें स्वारस्य आहे ? ध्येय व स्वभाव यात अंतर असावें, स्वभावापेक्षां ध्येय अधिक उंच असावें हें मला मान्य आहे; परंतु, माझें म्हणणें असें, कीं ध्येय व स्वभाव यांत नुसत्या अंतराऐवजीं जर पूर्ण विरोध असेल तर त्या ध्येयाची घोषणा व्यर्थच नव्हे काय ? आकाशांत खूप उंच भरारी मारावी असें एखाद्या घोड्याला सांगितलें तर त्याचा काय उपयोग ? किंवा कठिण कवटीच्या नारळाऐवजीं सुंदर लुसलुशीत द्राक्षफळांची उत्पत्ति करावी असा नारळाच्या झाडांना उपदेश करण्यांत काय अर्थ आहे ?

आमच्या शास्त्रकारांनीं आमच्यापुढें ठेवलेलीं ध्येयें याच मासल्याचीं आहेत, अशी सूज्ञ लोकांची उत्तरोत्तर खात्री होत चालली आहे. असल्या ध्येयाच्या प्रचारामुळें, आणि त्या ध्येयाच्या सिद्धतेसाठीं रूढ केलेल्या विधिनिषेधांच्या जांचामुळें स्वभाव एक आणि धांव भलतीच अशी आमची स्थिति आजपर्यंत झाली आहे. जो स्वर्ग कधीं कोणीं पाहिलेला नाहीं, त्या स्वर्गांत एकंदर लोकसंख्येपैकीं हिंदूंची लोकसंख्या किती असेल कोण जाणे ! पण इहलोकचें जीवित मात्र आम्हां हिंदु लोकांना बहुतांशीं कष्टमय आणि दुःखकारकच होत आलें आहे याबद्दल संशय नाहीं !

तेव्हां स्वतःच्या स्वभावाशीं जी चमत्कारिक झुंज आम्हीं सतत चालू ठेवली आहे ती प्रथम बंद केली पाहिजे. आपल्या कांहीं प्रवृत्ति पशूंच्या प्रवृत्तींसारख्याच वाटल्या तर केवळ तेवढ्या साम्यावरून त्या अनिष्ट मानण्याचें आपण बंद केलें पाहिजे. पशु कोटीचा व मनुष्याचा संबंध जर उघड उघड आहे तर त्या संबंधाचीं माणसानें नेहमीं शरमच बाळगली पाहिजे असें कां म्हणावयाचें ? तसेंच पाहिलें तर ज्या प्रेरणांवर मानवी जीवितांतील अत्यंत उदात्त आणि काव्यमय भाग अवलंबून आहे त्यासुद्धां पशुकोटीपासूनच वारसा म्हणून मनुष्यानें घेतल्या आहेत. अपत्यसंरक्षणाच्या प्रेरणेमुळेंच मानवी कुटुंबसंस्थेचा उद्भव झाला ना ? त्या संस्थेमुळेंच संस्कृतीला अधिकाधिक उन्नत आणि प्रगत स्वरूप सारखें येत राहिलें आहे ना ? आणि त्या प्रेरणेचींच स्तुतिस्तोत्रें कवि गातात आणि नयनमनोहर चित्रें चित्रकार रेखाटतात ना ? पण खरें पाहिलें तर अपत्यसंरक्षणाची प्रेरणा मूळची पशूंची ! पशुकोटीपासूनच ती माणसानें उचललेली ! आणि हें जर खरें, तर अमुक एक मानवी प्रेरणा पशुतुल्य आहे येवढें म्हटल्यानें ती निषेधार्ह कशी काय ठरते ?

आधुनिक मानसशास्त्रानुसार तरी असला निषेध समर्थनीय ठरत नाहीं. आणि म्हणूनच मानसशास्त्रज्ञाची आजची शिकवण अशी, कीं मनुष्यानें स्वतःशीं अगर समजाशीं लपंडाव करण्याचें सोडलें पाहिजे. ज्या विविध प्रेरणा मनुष्यस्वभावानुसार आपल्यामध्यें आहेत त्यांचें अस्तित्व प्रामाणिकपणें कबूल करणें ही खऱ्या मोक्षसाधनाच्या वाटेची पहिली पायरी. हा प्रामाणिकपणा आपण एकदां पत्करला, कीं आपला धर्म, आपली नीति, आपले सामाजिक आचारविचार, कार्याकार्याविषयींच्या आपल्या कल्पना, या सर्वांचें स्वरूप कसें बदलावें हें आपलें आपल्यासच सहज कळूं लागेल. बालसंवर्धन आणि समाजनियंत्रण ह्या दोन गोष्टी तत्त्वतः सारख्या आहेत असें विधान पूर्वीच्या एका प्रकरणांत मीं केलें तें वाचकांनीं आठवावें. व्यक्तीचा धीटपणा व आत्मविश्वास ज्यामुळें वाढेल, आपण स्वभावतः अमंगळ नसून पवित्र आहोंत असें समाजांतल्या स्त्रीपुरुषांस ज्यामुळें वाटेल, त्यांच्या कर्तृत्वशक्तीस ज्यामुळें अधिकाधिक वाव मिळेल, आणि भीतीपेक्षां प्रीतीचाच विकास त्यांच्या

ठिकाणीं ज्यामुळें सारखा होत जाईल असेच विधिनिषेध या नवयुगांत घालून दिले पाहिजेत. असें केल्याखेरीज आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनांत सुखाचा लाभ आपल्याला होणार नाहीं.

कारण, ' सुखसमाधान ' म्हणून ज्याला आपण म्हणतों तें कांहीं एखाद्या झाडाच्या फांदीला लटकलेलें पिकलेलें फळ नव्हे, कीं आपण त्या झाडाखालीं निजून तोंड उघडण्याचाच आवकाश, कीं तें आपल्या तोंडांत पडेल ! किंवा तें असें एखादें गुप्त धनही नव्हे, कीं जें मिळवायसाठीं संसाराला भिऊन अरण्यांत पळ काढला पाहिजे व तेथील जमीन खणीत सुटलें पाहिजे ! आळशाला अगर दांभिक संन्याशाला तें कधींच मिळावयाचें नाहीं. या संसाराच्या धकाधकींतच तें मिळतें ! केवळ सदाचारांतच तें मिळतें असेंही नाहीं. सदाचारासाठीं केलेल्या धडपडींतही तें मिळतें ! यशापयशांत–दोहोंतही–तें आहे ! किंबहुना, संसारांतल्या बऱ्या वाईट प्रत्येक घटनेंत तें आहे. मात्र ती घटना आपल्या कर्तृत्वानें घडून आली अशी माणसाची भावना पाहिजे.

आजपर्यंत ज्या चुकीच्या मानसशास्त्राचा आमच्या जीवनक्रमावर पगडा रहात आला आहे त्यानें आमची कर्तृत्वाची जाणीव शून्यवत् करून टाकली आहे. सत्कृत्य घडलें तर त्याचें सारें श्रेय परमेश्वराला, आणि माणसाचें कर्तृत्व फक्त असत्कृत्यापुरतें अशी विचित्र शिकवणूक आमच्या रोमरोमांत भिनून गेली आहे. माणसाच्या स्वभावसिद्ध प्रेरणांतून सुखापेक्षां असुखाचीच उत्पत्ति होण्याचा संभव अधिक असें विपरीत मानसशास्त्र आम्ही गृहित धरल्यामुळें, स्वाभाविक जीवनाऐवजीं निराळ्याच कृत्रिम, काल्पनिक जीवनक्रमाकडे वळल्याखेरीज सुखप्राप्ति होणार नाहीं अशा वेदान्ताचा आम्ही पुरस्कार करीत आलों.

आतां हें मानसशास्त्र व त्यावर आधारलेला हा वेदान्तही टाकला पाहिजे. सुख कोठल्या तरी काल्पनिक परलोकांत आहे असें मानण्याऐवजीं येथें इहलोकांतच तें आहे ही खूणगांठ मनाशीं ठेवली पाहिजे; आणि निसर्गदत्त प्रेरणांची लाज अगर भीति बाळगण्याची भलतीच शिस्त लहान मुलांवर अथवा बहुजनसमाजावर लादण्याचें बंद केलें पाहिजे.

मुलांचें काय अगर बहुजनसमाजाचें काय, संगोपन करायचें असेल तर त्यांना सतत धाकांत ठेवून त्यांच्या ठिकाणची स्वयंप्रेरणा मारून टाकल्यानें तें होत नाहीं, तर त्यांच्या स्वयंप्रेरणेस परोपरीनें वाव दिल्यानेंच तें होतें हा नवमानसशास्त्राचा मूलभूत सिद्धांत आहे. हा सतत दृष्टीपुढें ठेवला म्हणजे आपल्या वागणुकींत कोणकोणते फरक केले पाहिजेत, व विधिनिषेधांच्या कल्पना कशा बदलल्या पाहिजेत, तें सहज कळण्यासारखें आहे. मनुष्यानें ज्या सुखसमाधानाची हांव बाळगायची तें एकाद्या मूर्तिकाराला आपल्या कलाकृतीपासून मिळणाऱ्या आनंदासारखें आहे. तो आनंद मूर्तिकाराला केव्हां मिळतो ? तर ज्यांतून मूर्ति निर्माण करावयाची त्या पदार्थांचे गुणधर्म, आपलीं हत्यारें, व आपलें कलातंत्र यांची बिनचूक समजूत करून घेऊन तो आपल्या कामाला लागला तर ! लांकूड कोरण्याच्या हत्यारांनीं तो संगमरवरी दगड कोरूं लागला तर आल्हादाऐवजीं निरर्थक कष्ट व निराशा मात्र त्याच्या वांट्याला येईल !

पण आपण अशा भ्रमिष्ट मूर्तिकाराप्रमाणेंच वागत आलों आहोंत. आपला स्वभाव काय आहे, त्या स्वभावास अनुरूप असें कोणतें ध्येय आपल्याला नजेरपुढें ठेवता येईल, निसर्गानें आपल्या हातीं कोणती साधनसामुग्री व हत्यारें दिलीं आहेत इत्यादि प्रश्नाचा आपण कधीं नीट विचार केलाच नाहीं. नवमानसशास्त्रातील जे मुख्य मुख्य सिद्धांत स्थूलपणें वाचकांच्यापुढें मीं गेल्या अकरा प्रकरणात ठेवले त्यावरून या प्रश्नांचीं उत्तरें वाचकांच्या लक्षांत आलीं असतील; व सुखाचा मार्ग कोणत्या दिशेला आहे याची थोडी तरी कल्पना त्यास आली असेल.

सुख प्रत्येकाला हवें आहे; पण तें फार थोड्यांना मिळतें. याचें कारण असें, कीं आपण सुख हवें असें एकीकडे तोंडानें म्हणत असतों, आणि दुसरीकडे दुःख निर्माण व्हावें अशी व्यवस्था आपल्या हातानेंच करीत असतों. स्वतःशीं सतत भांडत आणि झगडत राहिल्यानें दुःखाशिवाय दुसरें काय निष्पन्न होणार ? हें दुःख ज्या प्रमाणांत नष्ट केलें जाईल त्या प्रमाणांत मानवी सुखाचें प्रमाण खचित वाढेल !

आणि नवमानसशास्त्राचें कांहीं कार्य असेल तर हेंच! माणसानें स्वतःचा स्वभाव नीट ओळखावा, असा असा माझा स्वभाव आहे असें प्रामाणिकपणानें म्हणावें, आणि भीतीऐवजीं प्रीति हीच सर्व वैयक्तिक व सामुदायिक व्यवहारांची प्रेरक शक्ति असेलसें करावें असें आजच्या मानसशास्त्राचें सांगणें आहे.

ते सांगणें वाचकांच्या कानावर घालायसाठीं ज्या गोष्टी लिहायच्या योजल्या त्या लिहून झाल्या. मानसशास्त्राच्या नवीन सिद्धान्ताचें ज्ञान झालें, कीं आमचीं सारीं दुःखें संपतील असा भ्रम माझ्या ठिकाणीं नाहीं व त्यामुळेंच तो वाचकांत पसरावा असा माझा हेतु असणें शक्य नाहीं. मानवी जीवितांतलें दुःख-बीज कधीं पूर्णपणें नाहींसें करतां येईल कीं नाहीं हेच मुळीं शंकास्पद आहे. तें नष्ट झाल्यास सारें काव्यही नष्ट होईल असेंही वाटतें; पण 'सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें' ही उक्ति उलटी फिरवतां येईल येवढें खास! तें करण्यासाठीं झटावें असें ज्यांस वाटत असेल त्यांस नवमानसशास्त्रानें प्रोत्सा-हन मिळेल व दिशा दिसेल या हेतूनें येथपर्यंतची चर्चा केली. सर्व दुःखांवर लागू होणारी एकच मात्रा ज्यांना हवी असेल त्यांच्या-साठीं ही चर्चा नाहीं. नवीन सिद्धान्तांचें ज्यांना भय वाटत नाहीं, जुन्या कल्पना टाकण्यास जे कचरत नाहीत, आपल्या दृष्टीचा टप्पा वाढवावा, व वाढवितां येईल असें ज्यांस वाटतें, निर्गुण ब्रह्मापेक्षां अगर साकार परमेश्वरापेक्षां स्वतःच्या स्वभावाचें सम्यक् ज्ञान करून घेण्यांत अधिक कल्याण आहे हें ज्यांस कळतें, आणि स्वतः सुखसमा-धानांत राहून आपल्या आप्तस्वकीयांत, मित्रपरिवारांत, सहकाऱ्यांत आणि समाजांत समाधानाचीं किरणें पसरावीं असें ज्यांस वाटतें त्यांसाठीं हें सारें लिहिलें. अशा समानधर्मी वाचकानीं थोडीशी शाबासकी दिली आणि भिन्नधर्मी वाचकांच्या विचारास थोडीशी तरी चालना मिळाली म्हणजे माझें लिहिणें सार्थकीं लागलें असें मी मानीन.

समाप्त